आज तू आला असतास; तर मी खात्रीने मोठ्या आतुरतेने दार उघडलें असतें; आणि सायंकाळपासूनचा सारा वेळ तुझ्याशीं बोलण्यांत, तुला फसविण्यांत, माझी फसवणूक करून घेण्यांत, ईश्वर आणि मानव, मृत्यू आणि प्रीति ह्या सर्वांची फसगत करण्यांत व्यतीत केला असता. मी तें मोठ्या सफाईने करूं शकलों असतों आणि यशस्वीहि झालों असतों. सुट्यांचे दिवस होते. तुला भेटण्यासाठीं मी काशीला आलों होतों. नंतर आपण उत्तर हिंदुस्थानांतल्या प्रवासाला निघालों. दोन महिन्यांचा तब्बल अवधी आपण खूप खूप भटकण्यांत घालविला. आग्र्याचा ताजमहाल, तेथील लाल किल्ला...नंतर दिल्ली. दिल्लीचा लाल किल्ला, कुतुबमीनार सफदरजंग, भुलभुलैय्या, हुमायूनचा मकबरा, अशोककालीन अवशेष...नंतर लाहोर. तेथील वातावरण, गुरुनानकाची समाधि, शालिमार बाग, किल्ला, आणि खूप खूप भटकणें. लाहोर म्हणजे हिंदुस्थानांतली रंगेल नगरी. लाल–हिरव्या–पिवळ्या रंगांचीं जिवंत मानवी पांखरें. सज्जांत आपण उभे होतों. रस्त्यावरून हिंडणारीं तीं रंगीत मानवी पांखरें पाहत होतों. काय तें जीवन ! तेथें जगणारांना उद्यांची फिकीर नसते. मजेंत जगायचे एवढेंच त्यांना ठाऊक. उमर खय्याम इराणांत जन्मला होता. इराण आपल्यापेक्षां लाहोरच्या जवळ आहे. उद्यांची फिकीर नसणारीं माणसें मस्त असतात. त्यांनाच खरेंखुरें जगतां येतें. मी हसत हसत म्हणालों होतो, ‘ लाहोर ज्याने पाहिले नाही, तो जन्मलाच नाही ! ’ माझें बोलणें ऐकून तूं हसलीस आणि रागावलीस. म्हणालीस, ‘ पुरुष असेच भाळतात. ’ तेव्हां मी म्हणालो, ‘ जो पुरुष असा भाळत नाही, तो स्त्रियांना आवडूंच शकत नाही. अत्यंत निष्ठावन्त माणूस असला कीं स्त्रियांना तो नकोसा होतो. स्त्रियांचा तो एक स्वभावविशेष आहे. आयुष्यांत फसविणारी व्यक्तीच त्यांना अधिक आवडते. ’–तूं फारच रागावलीस. तेव्हां मी म्हणालों, ‘ सुंदर दिसतेस. तूं अशीच सुंदर दिसावीस म्हणून असेंच बोलत राहिल्यास वावगे नाही. ’ मग तूं म्हणालीस, ‘ फसविण्याचा विचार आहे वाटतं ? ’ मी म्हणालों, ‘ अद्याप नव्हता. पण सौंदर्यासाठीं डोळे आसुसले आहेत. फसविल्याशिवाय तें सौंदर्य दिसतच नाही...कोणीं सांगावे ?...’ खूप खूप बोललो. नंतर आपण असेच कितीतरी दिवस घालविले. तुझी सुटी संपायला आली होती. आपण काशीला परत गेलो. काशी हें तीर्थक्षेत्र आहे. हिंदूंची तीर्थक्षेत्रें नेहमीच गलिच्छ नि अमंगळ असतात. पण आपण राहत असं तें ठिकाण स्वर्गाची

बरोबरी करणारे होते. तेथें कुणाचाच संपर्क नव्हता. गंगानदी जवळच होती. तेथील जलविहाराची कोण गंमत! ह्या तीर्थक्षेत्रांत येऊन लोक अखेरची तीलांजली देतात. कुठें मुंबई आणि कुठें काशी! –जणू काय, इतक्या लांबून मी माझ्या जिवंत मरणाची तिलांजली देण्यासाठींच तेथें आलों होतों! –जाऊं दे. पण आपण परत आल्यानंतरचा तो दिवस आठवतो का? विद्यालयाच्या मागच्या टेकडीवर आपण बसलों होतों. रात्र झाली तरी बोलत होतों. नंतर टेकडी उतरायला लागलो. उतरतांना माझा पाय घसरला. शरीरावर ताबा राहिला नव्हता. मी घसरत गेलो. तूं ओरडत होतीस. त्याच दिवशीं मला माझ्या छातीतली धडधड प्रथम ऐकूं आली. छातींत कळा निघूं लागल्या होत्या. मी उत्तुंग शिखरावर चढलों होतों. तेथूनच पाय घसरला. आयुष्यांत असाच अचानक पाय घसरतो. तसा पाय घसरला की, पाताळांतच जावें लागतें. पुन्हां वर चढण्याची उमेद राहत नाही. त्याच दिवशीं मला हृदयाचा विकार जडला. केव्हां काय होईल तें सांगवत नाहीं. कांहीं झालें नाही, तर असेंच मेल्यासारखें जगायचें. टेकडीवर उभा होतों तव्हां तूंच माझ्याकडे पहात म्हणाली होतीस, ‘सायंकाळच्या अशा प्रकाशांत तुझ्याकडे पाहून एखाद्या ऐटबाज पुतळ्याची आठवण होते.’ –खरें असेल. पण तूं चुकलीस. जगांत ऐट थोडा वेळ टिकते. साम्राज्य मिळविणारे ग्रीक पुरुष–महान् लढवय्ये. पण त्या सर्वांनाच मृत्यूच्या जबड्यांत जावें लागले. त्यांचे निर्जीव पुतळे आज दिसतात; पण ते कुठें आहेत? निर्जीव स्वरूपांत सर्वच जगतात. मीसुद्धां आज तसाच नाही का जगत? ...आणि मला वाटतें, उगाच हें सारें आठवले. तुला त्याचें कांहीं वाटणार नाही. स्त्रीजात विसराळू असते म्हणूनच जगूं शकते. पुरुषांचे तसें नाहीं. त्यांना तसें विसरतां येत नाहीं; आणि म्हणूनच अशा स्थितींत त्यांना जगतांहि येत नाहीं. स्त्रीजात जितकी लाघवी तितकीच मायावी आहे. पुरुषांना जगावयाचें असेल, तर त्यांनी स्त्रियांना फसवतच जगले पाहिजे. ह्या अखेरच्या क्षणालासुद्धां तसेंच वागण्याचा मीं निश्चय केला आहे. आलम मानवजातीला आणि ईश्वरालासुद्धां फसवितां आलें तरच पुरुषजात जगेल. तुझ्या डोळ्यांत अश्रु उभे आहेत–तें मला दिसत आहेत. त्या डोळ्यांना ऊब आणण्यासाठीं आणखी निदान एक तासभर तरी मला अभिजात कलावन्ताचीं अशींच चित्रें रंगवीत राहिलें पाहिजे. पण ही सारी फसवणूक आहे–फसवणुकीशिवाय दुसरें कांहीं नाही. तसें पाहिलें तर मी खरोखरीच

अभिजात कलावंत नाही. मला कोणतीं चित्रें रंगवितां येणार ? तशीं चित्रें पुन्हा कधींहि रंगविण्याचा मी प्रयत्न करणार नाही.

मी थकलों आहे. माझ्या आयुष्यांत मला प्रत्येकच गोष्ट उशिरा मिळत गेली. रागावूं नकोस. रडूं नकोस. मला तुझें प्रेम नको आहे—त्याची आतां गरज उरलेली नाही. ही भाषाच थांबविलेली बरी. फसवणुकीचें बीजारोपण करावयाला नको—नाही तर त्यांतून जीं फुलें जन्माला येतील ती तिरस्कारालाच पात्र ठरतील !—गेला संपूर्ण महिना मी ह्याच विचारांत घालविला. मला परिस्थितीची नीट जाणीव झाली आहे. तुला आठवतें का ? सुरुवातीस मी सारखा बोलत सुटायचा. त्या बोलण्याला सीमा नव्हती. तूं केवळ ऐकत असायची. माझें बोलणें ऐकून भांबावून जायचीस आणि औदासीन्याची दाट छाया तुझ्या चर्येवर दिसायची. शब्दांचे अर्थ तुला कळत नसत. पण शब्दसागराचा तुझ्यावर तसा परिणाम मात्र होत असे. चालण्याची शक्ति तुझ्यांत राहत नसे. तुझा हात धरून मी तुला चालत न्यावयाचा आणि झोंपवावयाचा. मुंबईला तूं आलीस. हेच दिवस—हीच तारीख. काशीला भेट—त्यानंतरची ती पहिली भेट. तूं काशीहून आली होतीस. तातातुटीचें लोण घेऊन इतक्या दूरवर आली होतीस. तूं आलीस. माझें दार बंद होतें. तूं दार ठोठावलेंस, पण मीं उघडलें नाहीं. घराला दार कशासाठीं असतें ह्याची जाणीव प्रथम मला त्या दिवशीं झाली. तूं बाहेरून हांका मारीत होतीस. हलक्या आवाजांत म्हणत होतीस—'नाही... नाही...!'

—सर्वच गोष्टी आयुष्यांत उशीरा घडतात !

माझी गाडी सकाळीं सुटणार. सामानाची आवरासावर झाली आहे. पण परिटाकडून अद्याप कांही कपडे यावयाचे आहेत. आजची रात्र मोठी सुखाची असेल. जाणूनबुजून आज एका स्त्रीवर—नव्हे भालम स्त्रीजातीवर दया करण्याचें वाण मीं हातीं घेतलें आहे. माझ्या ह्या म्हणण्याचा अर्थ तुला कळतो का ?... त्या वेळीं मी सात—आठ वर्षांचा असेन. मला बिस्किटें फार आवडायची. एका बिस्किटाच्या तुकड्यासाठीं कांहीहि करण्याची माझी तयारी असे. कुणाला ठाऊक कां, पण हवीं तेवढीं बिस्किटें विकत घेण्यास माझ्याजवळ पुरेसे पैसे केव्हांच नसत.

त्यांचा तो मोहक आकार आणि खमंग वास मला अजूनहि आठवतो. लक्षावधीं बिस्किटें आपणांस मिळावींत असें वाटे...आणि त्या गोष्टीला आज अनेक वर्षें लोटून गेलीं असलीं आणि त्या अवधींत मी अनेदां अनेक बिस्किटें खाल्लीं असलीं तरी भूक अद्याप शमली आहे असें वाटत नाही. ह्याचा अर्थ तुला कळतो का? हजारों बिस्किटें विकत घेण्याची आज माझ्यांत शक्ति आहे-पैसे आहेत. कधीं कधीं विकत घेतों—पण न खातांच गडीमाणसांना ती वांटून टाकतों. हीं बिस्किटें मला नको आहेत. ती माझीं नाहीत; आणि त्यांची चवसुद्धा आतां पूर्वींसारखी राहिलेली नाही.

हें हवें तें मिळालें; पण फार उशीरां मिळालें!—आणि बिस्किटांची ही गोष्ट म्हणजे ह्या निर्जीव नाटकाच्या सुरुवातीची प्रस्तावना आहे, एवढेंच!

नंतर मला प्रवास करणें फार आवडूं लागलें. ह्या इच्छेचें अनिवार स्वरूप सांगून सांगता येणार नाही. खूप भटकलों. नवीन देश, नवीन नद्या, नवे लोक, नवें सौंदर्य—सारें कांही नवनवीन पाहत सुटलों. अनिरुद्ध भटकत होतों. कांही माणसें अशींच भटकत राहायला जन्मास येतात. नाही नाही तें पाहिलें. त्रास अनुभवला. सुख पारखलें. सारेंच नवें. नव्याचा आनंद ओसंडून वाहत असल्यासारखें वाटलें. पण...

तो आनंद मला अनुभवतां आला, पण फार उशीरां. सर्वच गोष्टी फार उशीरां मिळतात आणि त्यांतच माझ्या असमाधानाचें बीज रुजलें आहे मिति... होय, प्रीति!—ती दुनिया ईश्वरशापित आहे. तेथें अनियमितपणा हा कायदा आहे. यामुळें तेथील कोणतीच गाडी कधीं वेळेवर पोचत नाही. तेथील स्टेशनमास्तरसुद्धा बेडपट नि वावळट असतात. गार्ड गाडीचें संरक्षण करतात: पण अव्याहत होणाऱ्या अनेक अपघातांमुळें त्यांची ती संरक्षणशक्तीहि नाहीशी झाली आहे. माणसांपासून तों थेट वेळापत्रकापर्यंत सारेंच कांहीं चुकलेलें. कशावरच विश्वास ठेवतां येत नाही—कशाचीच शाश्वति वाटत नाही. तेथील सर्व घड्याळें आणि माणसांचे व्यवहार फसवे आहेत. मदिरा पिऊन थयथय नाचत सुटणाऱ्या पिशाच्चांच्या जगासारखें तें विचित्र नि विस्मयकारक जग आहे. त्या पिशाच्चांना थांबवून,

हातानें धरूं म्हटलें तर तें शक्य नाही—हातांत वारा धरुन ठेवतां येतो का?... आणि प्रेम!—अखंड विभक्तेच्या असीम अंधारांत तें गुप्तपणें कुठेंतरी वावरत असतें. काळ्याशार मेघावलींत वीज चमकून जावी तसें तें क्षणकाल चमकतें आणि त्याच वेळीं अज्ञात प्रीतीच्या चैतन्याची किंचित् जाणीव होते.

माझ्या निष्ठुर नि भयाण गतायुष्याची कहाणी तुला ठाऊक आहे. मी ती पुन्हां तुला सांगणार नाही. गतायुष्याच्या त्या जगांत अनेक पिशाचें आहेत. पण तीं सर्व शांत आहेत. त्यांच्या त्या शांततेकडे पाहिलें की मनांत आदर निर्माण होतो. पण तेथें एक स्त्री सदैव वावरत असते. ती थडग्यांत पुरली गेली, तरी तिला समाधान लाभूं द्यावें अशी माझी इच्छा नाही. ती महामूर्ख बाई आहे. एक माणूस मुद्दाम नोकरीला ठेवून तिच्या थडग्यावर रात्रंदिवस जड काठीनें मारत राहण्यास त्याला सांगेन, म्हणजे थडग्यांत सुद्धा तिला शांतता लाभणार नाही. थोडा विचार कर. सहा वर्षें उशीरां तिचा व माझा संबंध आला. सहा वर्षें मीं तिची प्रीति संपादण्यांत घालविलें. नाही नाही तें केलें. पण ती बावचळल्यासारखी झाली होती.; अशा अनिरुद्ध स्थितींत सहा वर्षें काढली. लग्न झालें. पण त्यांत राम नव्हता. मी आणि माझें प्रेम ह्यांचा विचार नेहमींच अखेरीस होत असे. सहा वर्षांचा दीर्घ कालावधी!—प्रतिक्रियेमुळें मी तुझी असूया जागृत करणार नाही. माझ्या वेडेपणामुळें आणि वाटणाऱ्या दुःखामुळें ती प्रतिक्रिया निर्माण झाली हें मला ठाऊक आहे. होय-मी दुःखी होतों. त्या ईश्वरशापित जगांत राहणारा प्रत्येक मनुष्य तसाच असतो—त्याची गाडी नेहमींच चुकत असते. पण एक गोष्ट तुला सांगून टाकली पाहिजे. प्रीतीचा तो अखेरचा वणवा मनांत पेटला आणि मी वेडा होऊन गेलों. मन ठिकाणावर नव्हतें. तें सारखें भटकत असे. त्या वणव्याच्या ज्वाळा दूरवर जाऊन पोचल्या—त्या ज्वाळांसोबतच माझा होरपळलेला आत्मा दूरवर भटकण्यास गेला... खूप खूप भटकला... आणि नंतर तो परत माझ्याकडे आला. ह्या स्थित्यंतरानंतर मी एखाद्या बाहुल्यासारखा मुखस्तब्ध झालों. अंगांत त्राण राहिला नव्हता. शरीर फिक्कें पडलें होतें. निर्जीव स्तंभाप्रमाणे मी शांत दिसत होतों. रस्त्याच्या वळणावर वर्षानुवर्षें उभ्या असलेल्या जुनाट विराट वृक्षावर वीज पडतांना आणि त्या वरच्या नाजुक वेली त्या वृक्षासकट करपून जातांना तूं कधीं पाहिल्या आहेस का! माझेंहि तसेंच झालें. मी माझ्या प्रीतीचा गळा दाबला—प्राण घेतला!—

आणि फुरसतीच्या वेळीं त्यासंबंधीं मी जेव्हां विचार करूं लागतों, तेव्हां मला माझ्या शौर्याविषयीं गर्व वाटूं लागतो–विजयासंबंधीं धन्यता वाटूं लागते!

–आणि त्याच सुमारांस ती माझ्यावर प्रेम करावयास शिकली. ती तिची माझ्यावरच्या प्रीतीची पहिली जाणीव. ती आली. पण त्यालासुद्धा फार वेळ झाला होता. कारण, त्याच सुमारास तूंही माझ्याजवळ येत होतीस. असूयेने तुझे डोळे विस्फारित झालेले मी पाहिले होते. तुला तरी तें कसें सहन व्हावें!–इतक्यावरहि माझें तिच्याशीं लग्न झालेंच. अत्यंत अव्यवस्थित आणि गैरशिस्त होती ती. मला तें सहन होत नसे. तिला माझें मोठेंपण हवें होतें. श्रीमंती हवी होती. सर्व कांही तिला मिळालें. मला काय हवें होतें ह्याची मात्र तिला पर्वा वाटली नाही. तिचा हेकेड स्वभाव आणि तऱ्हेवाईकपणा सोडून दिला, तर ती खरोखरच अत्यंत इमानदार बायको होती, हें मी कदापि नाकबूल करणार नाही. इतक्यावरहि तिने एक फार मोठी चूक केली होती. जेव्हां मला तिची अत्यंत गरज होती तेव्हां ती आली नाही–फारच उशीराने आली. तिला मी रात्रंदिवस सारखा हांका मारीत होतों, तेव्हां ती कुठें गेली होती? –त्या वेळीं ज्यांना तिची गरज नव्हती त्यांच्याकडे ती धांवत सुटली होती.–

माझे हे विचार कडवट नि तिखट आहेत. पण त्या कडवटपणांतच सारासार बुद्धि आहे. ती आली तशी गेली. सर्वसाधारण स्त्री अशीच येते आणि जाते. तिला असें करण्यांतच आनंद वाटत असतो. तिच्या आनंदाचें तिला थैमान घालूं द्या. मी तर थकलों आहे. माझा दिवस ढळला आहे आणि शीण विलक्षण जाणवतो आहे. माझ्या सामानाची बांधाबूंध झाली आहे. खूप लांबचा प्रवास आहे–आणि तुझा अखेरचा निरोप घेतो आहे. तुझ्या सोबत येतां आलें नाही म्हणून सदैव वाईट वाटत राहील.

आगगाडी माझी वाट पाहत आहे. बांधाबूंध करून ठेवलेल्या ह्या वस्तू मला जन्मभर पुरणार नाहीत–प्रवासभरसुद्धा पुरणार नाहीत. ती बांधाबूंध निराळ्या वस्तूंची आहे. माझें वाढतें वय...माझ्या निराशा...आणि मला आलेला थकवा ह्या सर्व गोष्टींची बांधाबूंध करून मी प्रवासास निघत आहे. खूप लांबच्या एखाद्या

अज्ञात स्थळीं जाऊन, ह्या सर्व सोबतच्या वस्तू मी तेथें कायमच्या टाकून देणार आहे. त्या वस्तूंचें ओझें कमी झालें असतें तर समाधानाचा सुस्कारा तरी टाकतां आला असता. पण...पण...

आणि तूं म्हणतेस, तुझें माझ्यावर प्रेम आहे. मी निर्लज्जपणाने एक-एक अक्षर लिहितों आहे—**प्रे...म ! ...प्री...ति !** ह्या अक्षरांतला खराखुरा अर्थ मी कालांतरापूर्वींच विसरलों आहे; पण त्यांतील अद्भुत माधुर्य मनाची ओढ घेतें. मध्यरात्रीं घड्याळांत ठोके पडावे त्याप्रमाणें त्या अक्षरांच्या हांकेला 'ओ' देण्यासाठीं मनुष्य नेहमीच तळमळतांना दिसेल. ऐक—घड्याळांत ठोके पडले. पहाट झाली आहे. जग अद्याप झोंपलेलेंच आहे. तूंहि झोंप. पण मी मात्र माझ्या पूर्वायुष्यांतील सारें जग भटकून आलों आहे—आणि प्रत्येक माणसाला उत्तेजन देणारी ही प्रस्तावना लिहून ठेवली आहे.

माझें तुझ्यावर प्रेम आहे. प्रेम करूं नये असें वाटलें तरी तें शक्य नाही. पण मी अगदीं वेठीस आल्यासारखा भयंकर थकलों आहे. हो—पण तें सांगण्याचा माझा विचार नव्हता. तूं सुद्धां फार उशीरां जगांत आलीस. तुला नाही का वाटत तसं ? वर्षानुवर्षें झालीं, मी आडाखे बांधीत होतों—माझ्या गणिताप्रमाणे तूं अठ्ठावीस वर्षांनी उशीरां आलीस—तुझा जन्मच अठ्ठावीस वर्षांनी उशीरां झाला ! —हें बघ...

तुझें बालपण ओसरलें. खूप वर्षें झालीं. तूं सुंदर दिसूं लागली होतीस. तूं माझ्याकडे आलीस. दार उघडें होतें. तूं आंत आलीस—आणि कितीतरी सुंदर दिसलीस ! —पुन्हा तेंच. इतकें सुंदर होऊन जन्म घ्यायला तुला कोणीं सांगितलें होतें ? —माझ्या आयुष्याचें तूं स्वप्न झालीस. तें स्वप्न होऊन राहण्यासाठीं तूं आली नसतीस तर चाललें नसतें का ! दार उघडें दिसलें म्हणून आलीस—पण निदान मी जिवंत असे तोंपर्यंत तरी यावयाचें नव्हतें. त्यानंतर कितीदां तरी मी दार उघडलें असेल...पण नंतर काय झालें ? कोणीतरी आंत आलें का ? विश्वास ठेव. तुला पारखून घ्यायला, तुला ओळखायला, मला वर्षानुवर्षें घालविण्याची गरज नव्हती. हां हां म्हणतां मला सर्व गोष्टी पारखतां आल्या...आणि त्याच क्षणीं जाणीव झाली की तूं सुद्धा उशीरां आलीस व तेवढ्यामुळेंच हें दुर्दैव ओढवलें !

डॅान्टेने बिआट्रिसला पाहिलें—ती वेळ अशीच होती. बिआट्रिस आली तेव्हां खूपच उशीर झाला होता. जवळ होतें नव्हतें तें सारें कांही डॅान्टेने इतरांना देऊन टाकलें होतें—तो कंगाल, दरिद्री झाला होता...आणि...आणि बिचारी बिआट्रिस !

आणि माझेंहि तसेंच झालें. पूर्वायुष्यांत जर मी हेच शब्द लिहिले असते तर मला आत्महत्या करण्यासाठीं विष शोधीत हिंडावें लागलें असतें. पण आतां...... माझें अभावितपणें घड्याळाकडे लक्ष गेलें. सकाळचा चहा घ्यायलासुद्धा वेळ मिळेल की नाही ह्याचा संशय वाटूं लागला आहे. कालचा सारा दिवस मी विचार करण्यांत घालविला. पोटांत अन्नाचें शीत नाही, ह्यावर तुझा विश्वास बसेल का ? ...आणि आतां तुला खरें सांगतों. माझें तुझ्यावर निरतिशय प्रेम आहे असें मी म्हणालों—पण तें खोटें आहे. मी कोणावरहि प्रेम करीत नाही—मला कांहीहि नको. मला माझी शांतता हवी आहे. शांतता मृत्यूने मिळत असेल, तर तशीसुद्धा ती मला हवी आहे. तशी जर ती मिळत नसेल, तर जेथें कोणीहि येणार नाही......जेथें मनुष्य वावरत नाही...जेथें मानवतेचा संपर्क नाही...जेथें कोणी दार ठोठावीत नाही. .जेथें दार उघडें दिसतांच कोणी आंत शिरत नाही...जेथें रात्र आणि दिवस शांततेने पार पडतात...असें दूरचें—अत्यंत दूरचें—ठिकाण मी शोधून काढणार आहे. मी फार फार थकून गेलों आहे.

मला क्षमा कर. माझ्या कडवटपणाबद्दल मला पुन्हां एकवार क्षमा कर. झोपेशिवाय रात्र काढणें किती तापदायक नि दुःखद असतें त्याची कल्पना कर. जीवन शिथिल झाल्यासारखें वाटतें—विचित्र विचारांचा भडका उडतो. पण तसें आतां होणार नाही. हें जगणें म्हणजे एक नाटक—देखावा—आहे. माझ्या दृष्टीने जगांत एकच गोष्ट शिल्लक राहिली आहे आणि ती म्हणजे माणसाचा दिवस ढळत आला की पार्थिवतेंतून जीवनमुक्त होऊं पाहणाऱ्या व्यक्तीला येणारा भयंकर शीण ! जे आले ते गेले. ते ज्या वाटेने गेले ती वाट मला दिसते आहे. त्या वाटेवरच मी आतां पाऊल टेवणार—आणि त्यानंतर सारेंच आटोपत असतें ! मी तुझा अखेरचा निरोप घेत आहे.........

आणखी काय लिहूं ? माझ्या खोलींत येशील तेव्हां ती तुला वैराण झालेली दिसेल...पण नको. आतां आटोपतें घेतलें पाहिजे. आतां वेळ नाही. इतकेंच पुरे.

इतरांसाठीं तुझें सौंदर्य चिरकाल टिको-पण माझ्यासाठीं तूं फारच उशीरां आलीस!—"S"

## पत्र २ रें

तूं म्हणतोस क्षमा कर. मी क्षमा करूं तरी कशी?-तें शक्य नाहीं. तूं निघून गेलास-एकाएकी आणि न सांगतां निघून गेलास. जाण्यासंबंधी नीट खुलासा केला नाहींस किंवा जेथें जाणार तेथला पत्ताहि सांगितला नाहींस. आता मी काय करूं? मला कांहींच सुचत नाहीं-आणि तुला ठाऊक आहे, मला चांगलें लिहितां येत नाहीं-आणि लिहितां आलें तरी साध्या पत्रांत सत्य असें काय आढळणार?

मला भेटल्याशिवाय तूं असें कां केलेंस? किती पण वेडा आहेस? तुझ्या भावनाप्रधानतेची अशी जर जाणीव असती, तर तुझ्या दारांतून हललेंसुद्धा नसतें. रात्रंदिवस जागता पहारा केला असता. आज सकाळी तुझें पत्र मिळण्यापूर्वीच मी तुझ्याकडे गेलें होतें. खोली वैराण झाली होती-ती भयाण दिसली. मी मागल्या-दारून सरळ पळत सुटलें आणि परत आलें. नंतर मला तुझें पत्र मिळालें. तूं जिवंत आहेस...ईश्वराला द्यावे तेवढे धन्यवाद थोडेच होतील! मी विश्रब्ध होऊन बसलें आहे. सारेंच आश्चर्य!—

हो-त्या दिवशीं आपण टेकडीवरून उतरत होतों. तूं थकलेला दिसत होतास आणि म्हणूनच उतरण उतरीत असतां, तूं घाई करूं नये म्हणून मी रेंगाळत चालत होतें. पण तूं आपला धांवत सुटलास आणि अखेरीस काय करून बसलास -खरोखरीच एखाद्या ग्रीक पुतळ्यासारखा तूं ऐटबाज दिसायचास. पण त्या दिवशी पाय घसरल्यानंतर सारेंच संपलें! तूं थकलेला नि पांढरा फटफटीत दिसत होतास तसें मीं तुला पूर्वी कधींच पाहिलें नव्हतें. मला नीट आठवतो तो दिवस. मी तुझ्याकडे आलें. दार ठोठावलें. कुणालाहि भेटण्याची तुझी इच्छा नव्हती. तू

त्या दिवशीं सायंकाळी तुझ्याकडे आलें तेव्हां मीं तुझ्याकडे लक्ष पुरवावें ही तुझी अपेक्षा. पण तसें करणें म्हणजे केवढें दिव्य होतें हें माझें मलाच ठाऊक! मनुष्य अत्यंत थकलेला असला कीं असें होतें ह्यांत संशय नाही. नाही...मी तुझ्याकडे पाहिलेंसुद्धा नसतें. शेजारच्या खोलींत जाऊन स्वस्थ बसून राहिलें असतें. तूं जें लिहिलेंस तें उगाच लिहिलें. तुझें माझ्यावर निरतिशय प्रेम आहे हें मला ठाऊक होतें. त्या दिवशी, तूं दारापलीकडे लांबवर ऊभा होतास आणि मी सुस्कारे किंवा निःश्वास टाकीत नव्हतें. आनंदाचा उमाळा ओसंडत होता त्या वेळीं-ती सायंकाळ मला अत्यंत प्रिय वाटत होती!

पण आज वाटतें कीं तूं फारच आततांईपणा केलास. सर्वच गोष्टी उशीरां घडत असल्यामुळें दुःख निर्माण होतें असें वाटत असल्यास, माणसाने निदान त्या गोष्टी उशीरां होऊं न देण्यास झटले पाहिजे. सर्वच गोष्टी उशीरां होतात असें मला तरी वाटत नाही. तुझ्या मतें मी अठ्ठावीस वर्षें अगोदर जन्मलें. ह्या बोलण्याचा मला अर्थच कळत नाही. तसें असतें तर आतांपर्यंत मी म्हातारी झालें असतें; आणि तशा स्थितींत आपली भेट झाली असती, तर ओळख नसलेल्या तिऱ्हाइतांप्रमाणें आपण दोन दिशांनी दोघें विभक्त झालों असतों. तूं अगदीं तरुण होतास. मोठे मोठे काळेभोर केंस. सुंदर दिसावयाचास. स्वभावहि अवखळ. प्रेम करण्यांत आनंद वाटावयाचा म्हणूनच कुणावरहि तूं प्रेम करीत सुटावयाचा–त्याला ताळ ना तंत्र. असा तूं होतास; म्हणूनच मला आवडलास–हवासा वाटलास. तुझ्यासारखे कित्येक तरुण होते, मग मी तुझ्यामागेंच काय म्हणून धांवत सुटलें ह्याचा तूं कधीं विचार केला आहेस का?...

पूर्वी तूं नाठाळ होतास आणि आतांशा सारासार विचार करण्यास लागणारी तुझ्यांतली शक्ति नाहीशी झाली आहे. किती पण वेडा आहेस तूं! सत्याचा शोध कां केला नाहीस?...लक्षांत ठेव–उशीरां का होईना, पण जन्म घेण्यांत हेतू होता. कित्येक वर्षांनंतरची आपली पहिली भेट...नव्या मैत्रीनंतर दार उघडलें होते...आणि...आणि—तूं तूंच होतास आणि मी मीच होतें. त्या पहिल्या भेटींतच मी तुला प्रथम हसतांना पाहिलें. त्या तशा हसण्याची तुला त्या वेळीं जाणीव नव्हती. बुद्धिवैभवाच्या बळावर मिळविलेल्या तुझ्या कीर्तीवर किंवा श्रीमंती-

वर मी भाळलें नव्हतें. पण जाणीव नसतांहि तूं जें हसलास त्या हसण्यानें मी तुझी झालें–मला प्रेम करावयास लावलें–आणि माझें पूर्वायुष्य तेथेंच संपलें !

आतां तूं गेलास. कदाचित् मला तूं कधींहि गवसणार नाहीस...कदाचित् ह्या पत्रांतल्या ओळी तुझ्या कधीं दृष्टीस पडणार नाहीत...किंवा...किंवा हें पत्र तुला फार उशीर झाल्यानंतर मिळेल. किती भयंकर आहे ही परिस्थिति ! मी भ्यालें आहे आणि दुःखाच्या तापाने हृदय काजळून गेले आहे. तूं म्हणतोस, माझे हृदय तरुण आहे.–पण तें तरुण असलें तरी दुःखाची झळ त्याला सहन होत नाही. नाही–मी माझें अश्रू ह्या पत्रावर पडूं देणार नाही. मला जर धनुष्याचा बाण होतां आले असतें तर तुझ्याकडे येण्यास भरधाव निघालें असतें आणि तुझ्या हृदयांत खोलवर जाऊन बसलें असते. नंतर जगानें आपणां दोघांना एकत्र पुरले असते–जीव घेणारा बाण आणि मरणारा मनुष्य !...कृतघ्न, निर्दय, भावनाशून्य क्रूर आणि...पण कितीहि झाले तरी तं माझा आहेस !...

मला वाद घालायचा नाही. कदाचित् तुला तुझी बिस्किटें आणि ती गोडींत भेटलेली बाई उशीरां लाभली असेल–पण मी नाही ! मला चांगलें लिहितां येत नाही हें मी तुला सांगून टाकलें आहे. लिहायला बसलें कीं आपण अद्याप परकर-पोलका नेसलेल्या लहान पोरीसारख्या आहोंत असें वाटतें. आणि तू चालिश म्हटलेलें मला आवडणार नाही–सुंदर म्हटलेलें खपायचें नाही. सौंदर्याचा तोरा मिरवीत फिरणाऱ्या स्त्रियांपेक्षां मी फार निराळी आहे.

पण तूं गेलास. ह्यापूर्वीच माझें तुझ्यावर असीम प्रेम आहे हें मीं तुला स्पष्ट शब्दांत सांगून टाकलें असतें तर बरें झालें असतें. मी चुकलें. पण आपलें प्रेम स्त्रिया चटदिशीं बोलून दाखवीत नाहीत हें तुला ठाऊक नाही का ? तुला वाटे की मी बोलायला घाबरतें. कदाचित् थोडी घाबरतहि असेन. पण मी तुझें त्या दिवशींचें हसणें पाहण्यासाठीं थांबलें होतें–माझें तुझ्यावरचें प्रेम बोलून दाखविण्यास अजूनहि वेळ आहे असें वाटत होतें. मी पूर्णत्वाच्या अत्यानंदांत होतें, आणि त्या दिवशींच्या सायंकाळपर्यंतची माझी स्तब्धता–ती दुःखामुळें निर्मान झालेली नव्हती. अपार आनंदाच्या मनसोक्त विहाराच्या वेळची ती स्तब्धता होती. डोळे उघडे ठेवून झोपले आणि तुझ्या भावी आकांक्षांच्या चित्राकडे लक्ष दिलें नाही ह्याबद्दल क्षमा कर.

माझ्या उरांत धडकी भरली आहे ! तूं कुठें गेलास ? ह्या पत्राच्या निरनिराळ्या प्रती सर्वत्र पाठवीन—त्या तुझा पाठपुरवा करतील. एखादी प्रत तुझ्या हातीं पडेलच. असशील तसा मागल्या पाऊलीं परत ये. तुझ्याशिवाय असें राहण्याची भीति वाटते !

मन शंकेखोर आहे—तें भारावून गेलें आहे. नाही नाही त्या गोष्टी मनांत येत आहेत. कदाचित् तूं एखाद्या भीषण आपत्तींत सांपडशील...मला कशाचीच कल्पना नाही. समुद्र घातकी आहे. जमिनीवरचा प्रवास फार भीषण आहे. आगगाड्यासुद्धा कशा अगदीं सैल सुटल्यासारख्या भरधांव वेगाने धावत असतात ! तूं एकटा आहेस—मी तुझ्याजवळ नाही. आणि माझें हें पत्र तुला मिळालेंच आणि तूं त्याच वेळीं परत यायला निघालास...आणि एखादा अपघात घडला...पण नको. त्या विचारांनी डोक्याला तडे पडतात !

मी रडत नाही—पण भ्यालें आहे. ताबडतोब परत ये. तार कर...विलंब लावूं नकोस...मी थांबलें आहे...वाट पाहत आहे...आणि तूं माझा आहेस—माझा आहेस !

तुझीच
"I"

## पत्र ३ रें

प्रिय वाचक !—वरील दोनहि पत्रें मीं लिहिलेलीं नाहीत. तीं पत्रें लिहिणाऱ्या व्यक्ती जगाला फारशा ठाऊक नाहीत. पहिलें पत्र एका महान् साहित्यिकाचें आहे. त्याने स्वतःच्या नांवाने फारसें लिहिलेलें नाही आणि आज तो हयातहि नाही. आणि दुसरें पत्र लिहिणारी व्यक्ति आज हयात आहे किंवा नाहीं हें कुणालाच ठाऊक नाही. ह्या पत्रांचा पूर्वेतिहास जितका विचित्र तितकाच दुःखद आहे. कांहीहि असो. वरील दोन पत्रें वाचून तुमचें हृदय हळहळलें आणि डोळ्यांत अश्रू उभे राहिले, तर ते अश्रू तसेच ओघळूं द्या. अशा दुःखी लोकांच्या समाधानासाठीं, तुमच्या डोळ्यांतून बाहेर पडणाऱ्या अश्रूंची गरज आहे.

---

## थोडें मागे वळून पहा....................२

जीविताचा मार्ग चालून जात असतां थोडें मागे वळून पाहावें. गतायुष्यां-तील अनेक प्रसंग डोळ्यासमोर दिसूं लागतील. तीं स्मृतिचित्रें कधीं सुखद असतील, तर कधीं दुःखद!—पण तीं चित्रें सुखदापेक्षा दुःखदच असतात, असा माझा अनुभव आहे. गतायुष्यांत कित्येकदां अनेक लहानसहान गोष्टी घडतात–पण त्यांमुळे माणसाच्या जीवनावर कोण भयंकर परिणाम होतात ह्याची कल्पनाच केलेली बरी. माझेंहि असेंच झालें...

ही गोष्ट एका शेळीच्या पिलाची आहे. गोष्ट साधीच–पण तिचा माझ्यावर मात्र विलक्षण परिणाम झाला आहे, हें नाकबूल करून चालणार नाहीं. त्या वेळे-पासून मी कांहीसा एकलकोंडा आणि बराचसा तिरसट झालों.

जवळजवळ वीस वर्षे झालीं असतील. त्या वेळीं आम्ही वऱ्हाडांत राहत असूं. तें एक खेडेंवजा गांव होतें. तेथें कशाचीच उणीव नव्हती. माझे वडील श्रीमंत होते. आमचा शेतीवाडी होती आणि सर्व कांही होतें. खूप सुखी होतो आम्ही.

आमच्या घराशेजारींच एक दुसरा शेतकरी राही. तो गरीब होता. त्याच्या घरीं शेळ्यांचा एक मोठा कळप होता. दिवसांतला कितीतरी वेळ आम्ही त्या शेळ्यांशीं खेळत असूं. खेडेगांवांतील तें निरागस रम्य जीवन होतें. निरनिराळ्या जातींच्या अनेक फुलांचीं नांवें मला ठाऊक झाली होतीं. पांखरांचे आवाज ओळखीचे झाले होते. असें तें आनंदी आयुष्य होतें.

एके दिवशीं कळपांतल्या एका शेळीला एक पिल्लूं झालें. त्याच्या पांढऱ्या अंगावर पिवळट ठिपके होते आणि दिसायला तें फारच गोजिरवाणें होतें. शेजाऱ्यानें तें मारण्याचें ठरविलें.

मला तें सहन झालें नाही. त्याचे डोळे मजेदार होते. त्यांत सृष्टींतील सर्व नाजुकपणा सामावला होता. इवलासा जीव. मला त्याच्याविषयीं भलतेंच प्रेम वाटूं लागलें. माझ्या भावनाशीलतेबद्दल त्या शेतकऱ्यानें आणि त्याच्या मुलांनी माझी थोडी टर उडवली. मी दुर्लक्ष केलें आणि हळूच त्या पिल्लाला उचलून घराची वाट चालूं लागलों.

घरांत पाऊल टाकलें की वडाल माणसांच्या शिव्या खाल्या नाहीत असा एखादाच दिवस जाई. कारण ज्या ज्या वेळीं मी घरीं यायचा त्या त्या वेळीं कधी चिमण्या, तर कधी खार, तर कधी दुसरेंच कांहीं अशा तऱ्हेच्या गोष्टींची वरचेवर घरांत आयात होत असे. एकदां तर मी नदीकांठीं भटकत असतां लांडग्याचें एक पिल्लूं पकडून आणलें होतें.--आणि त्याने शेजाऱ्यापाजाऱ्यांच्या कोंबड्या मारल्या होत्या. पण ती दुसरी गोष्ट आहे.

ह्या आयातींतल्या वस्तू घरांत फार वेळ टिकत नसत ही गोष्ट निराळी. त्यांतल्या बहुतेक वडील हिसकावून घेत आणि बाहेर सोडून देत किंवा त्यांपैकीं कांहीं तशा उपयोगी असल्याच तर त्यांचा 'खातमा' होई. ते थोडे तापट आणि तऱ्हेवाईक होते. आईचा मात्र माझ्यावर भारी लोभ. हें असें होत असलें तरी इतर सर्व बाबतींत आम्ही सर्वच घरांत गुण्यागोविंदाने नांदत होतों.

शेतांत खेळत असतां एके दिवशीं माझ्या हातीं एक सशाचें पिल्लूं लागलें. पिल्लूं साधारण बऱ्यापैकीं नि गुबगुबीत होतें. त्या पिल्लाला पकडल्याबद्दल मला कोण धन्यता वाटली त्या वेळीं! मी तें घरीं आणलें. पण वडिलांना खपलें नाही. पिल्लूं घरांत ठेवायचें नाही असें त्यांनी साफ सांगून टाकले. कां ठेवायचें नाही हें अर्थातच मी विचारूं शकलों नाही. कारण वडिलांना प्रश्न विचारायचे नाहीत ही आमच्या घरांतली एक शिस्त होती. कांहींएक न बोलतां मी तें पिल्लूं पोटाशी कवटाळून उभा होतों--त्याला सोडण्याची माझी तयारी नव्हती. झालें!--वडिलांच्या रागाचा पारा चढला. ते रागाने चालून आले आणि त्यांनी पिल्लाची मान धरून जोराने ओढली. मला कसेसेंच वाटलें. तें आईने पाहावें एवढ्यासाठींच मीं आणलें.

होतें. बिचारें पिल्लूं !-तें त्याच क्षणीं अखेरच्या धापा टाकूं लागलें आणि......आणि...!—

तो प्रसंग अजूनहि माझ्या डोळ्यासमोर दिसतो !-

पण शेळीचें पिल्लू आणलें, त्या वेळीं तसें कांही झालें नाही. कारण वडील बाहेरगांवी गेले होते आणि आईला तें पिल्लूं आवडलें होतें. आणि गंमतीची गोष्ट अशी कीं, आईचें पाठबळ असल्यानंतर वडिलांची फारशी मात्रा चालत नसे.

लाकडाच्या नि वेळूच्या काठ्यांचें मीं एक छोटेसें घर तयार केलें. त्यांत वाळलेलें गवत अंथरलें. घर छोटेसेंच पण प्रशस्त होतें. मी स्वतःसुद्धा तेथें सहज लोळूं शकलों असतों. त्या दिवशीं मी त्या पिल्लाशीं खूप गोष्टी सांगितल्या आणि शेवटीं त्याला सांगून टाकलें कीं, तो बेटा मोठा भाग्यवान् आहे ! त्यानें माझ्याकडे पाहिलें, जीभ बाहेर काढली आणि छोटीशी मुसंडी मारली.

त्या पिल्लाला पाणी नीट पितां येईना. म्हणून एका बाटलींतून पाणी पाजण्याची मीं शक्कल काढली. त्याला मी गाईचें दूध पाजूं लागलों. दुधाबाबत घरांत आरडाओरड होऊं लागली, तेव्हां मी पाटलाच्या घरच्या गोठ्यांतील गाईचें दूध चोरून आणूं लागलों.

त्याच दिवशीं वडील परत आले. पिल्लूं रात्रभर ओरडत होतें. वडील संतापले. त्यांना झोप अत्यंत प्रिय होती आणि झोपेंत अडथळा आणलेला त्यांना खपत नसे. वडील रागावले त्या अर्थी तें पिल्लू घरांत फार वेळ राहत नाही अशी माझी खात्री झाली. पण तसें कांही झालें नाही.

कांही दिवसांनी त्या पिल्लाची नि माझी खूपच मैत्री झाली. तें मला ओळखूं लागलें. माझी चाहूलसुद्धा त्याला ओळखायला येई. माझा आवाज ऐकतांच ' बँ—एँ ' अशा आवाजांत तें उत्तर देई. मी समोर असलों की तें खाई-पिई. पण माझी पाठ फिरली की एकलकोंड्यासारखें उभें राही किंवा बसून राही. पण हळुहळू त्याचीहि त्याला संवय झाली.

आतां तें बरेंच मोठें झालें होतें. पूर्वीसारखें त्याला दूध पाजावें लागत नसे किंवा बाटलीने तें पाणी पीत नसे. आता तें पिंपळाचीं कोवळीं पानें किंवा हिरवें गवत खाऊं लागलें होतें. दररोज दुपारीं मला शाळेंत जावें लागे. सकाळीं मी हिरवी हरळी आणि पिंपळाची पानें आणून ठेवी नि त्याला खाऊं घाली.

सायंकाळीं मी शाळेंतून परत यायचा. घर जवळ आलें की मी जोराने ओरडायचा—'बूआऽऽ'; म्हणजे तें पिल्लूं 'बँ—एँ' करूं लागे. मी त्या पिल्लाला 'बूआ' म्हणत असे. माझी हांक ऐकली की तें माझ्याकडे येण्यासाठीं धडपडूं लागे आणि खुंट्याशीं बांधलेल्या दोरीशीं त्याची रस्सीखेच सुरू होई. त्याच्या नाकपुड्या फुरफुरूं लागत आणि डोळ्यांत आतुरता चमकतांना दिसे. एखादे दिवशीं माझ्या हांकेला त्याचें उत्तर आलें नाही, तर माझा जीव हडपून जाई आणि वडिलांनी कांही बरेंवाईट तर केलें नसेल ना, अशी शंका येई.

नंतर त्याला मी मोकळा सोडूं लागलों. मी जाईन तिकडे तें कुत्र्यासारखें माझ्यामागे भटकत असायचें. एखादे वेळीं त्याला खोडकरपणा करण्याची लहर येई. मी त्याच्यामागे धांवायचा नि तें टुणटुण उड्या मारीत फिरायचें.

एके दिवशीं तर कमाल झाली. तें पिल्लूं माझ्या पाठोपाठ शाळेंत आलें. तेथे त्याने खूपच गोंधळ घातला. बांकांवर उड्या मारीत मारीत स्वारी थेट मास्तरांच्या टेबलावर गेली—खूप नाचली. नाचतां नाचतां शाईची दौत लवंडली आणि मास्तरांचीं पुस्तकें रंगून गेलीं. मास्तर संतापले. त्यांनी स्वतःच्या हातांनी स्वतःचेंच कपाळ फाडफाड बडवून घेतलें—जणू काय ह्या प्रकारामुळें त्यांना वेडच लागलें होतें. अखेरीस मला त्याला घरीं न्यावें लागलें.

मीं शिटी वाजवावी, तें ऐकत उभें राही. नंतर त्याला लहर येई आणि तें टुणटुणा उडूं लागे.

ते उन्हाळ्याचे दिवस मला अजूनहि आठवतात. माझ्या आईला पायाचा आजार झाला होता. त्यामुळे चाकाच्या गाडीवर बसून तिला फिरावें लागे. माझी

वहीण बहुधा ती गाडी ढकलायची. गाडी जाऊं लागली की कित्येकदा 'बुआ' सुद्धां तिच्या पाठीमागे जायचा; गाडी थांबली की आईच्या अंगाखांद्यावर चढायचा. शेवटीं तिचे पाय चाटीत जमिनीवर लोळायचा; आणि एवढ्यांत माझी चाहूल लागली तर स्वारी क्षणांत जवळ येऊन पोचायची.

कांहीं असो, तो उन्हाळा म्हणजे माझ्या आयुष्यांतील संक्रमणकाल होता. हिवाळ्याच्या थंडीसोबतच जीवनाची नाजूक शिरशिरीहि आली. असा काळ प्रत्येकाच्या आयुष्यांत निदान एकदां तरी येतो. तो वऱ्हाडांतला उन्हाळा असला तरी सुंदर होता. दिवसा खूप ऊन्ह आणि रात्रीं नितांत शांत! आंब्याचीं नि मोहाचीं मोठमोठीं झाडें आणि क्षितीजापलीकडेसुद्धां लांबच लांब पसरलेली जमीन, सायंकाळच्या निवांतपणांत पेंगत असल्यासारखी दिसे. नागमोडी वळणें घेत जाणाऱ्या नदीच्या पृष्ठभागावरील सायंकाळचा रक्तिमा हळू हळू पुसट होत जाई. लांब चोचीचे पांढरे पक्षी मासे पकडतांना दिसत. वनवाघुळांचें ओरडणें ऐकूं येई. ह्या सर्व गोष्टी म्हणजे निसर्गाचें निशानिमंत्रण होतें—आणि अशा वेळीं आई आपल्या हातगाडीवरून घरीं परत येतांना दिसे आणि तिच्या पाठोपाठ 'बुआ' चालत असलेली दिसे. असे सुंदर दिवस होते ते!

पण हळूहळू 'बुआ' भारीच बोजड होऊं लागली. तिच्या अंगांतला खेळकरपणाहि नाहीसा होत चालला. कित्येकदा घरीं कोणी तिऱ्हाईत इसम आल्यास त्याच्याशीं आपल्या शिंगांनी टक्कर घेण्यास 'बुआ' कमी करीत नसे. ती दिसायला पूर्वीपेक्षा गंभीर नि थोडीशी रागीट दिसूं लागली होती. एके दिवशीं सायंकाळीं 'बूआ' ने खूपच गंमत केली. तिने आपल्या शिंगांनी माझ्या वडिलांना जोराची मुसंडी मारली आणि तेव्हांपासून एखाद्या चावऱ्या कुत्र्याला भ्यावें त्याच प्रमाणें ते 'बुआ' ला भिऊं लागले. असें नाठाळ जनावर घरांत ठेवल्याबद्दल मलाहि कान पिचक्या नि चापटपोळया मिळाल्या. आणि असे प्रकार मग नेहमीच घडत.

आणि मीसुद्धां मोठा झालों होतों. बारा वर्षांचा होईपर्यंत, मला वाटतें, माझ्यांत फारशी अक्कल नव्हती. आणि नंतर मी एकदमच वाढीला लागलों. कित्येकदां तर लोक म्हणतसुद्धा की, मी सपाटून वाढत चाललों म्हणून!

एकें दिवशीं आमच्या गांवी तहिसिलदारसाहेब आले. ते आमच्याकडे आले तेव्हा साहजिकच त्यांची दृष्टि 'बुआ' वर गेली. त्यांना दोन मुली होत्या आणि त्या आजारी होत्या. शेळीचें दूध पाजावें असें वैद्याने सांगितलें होते. 'बुआ'ला घेऊन गेल्यास आयती सोय होईल असें त्यांना वाटलें आणि त्यांनी तशी मागणीहि केली. त्यानंतर माझे वडील आणि तहिसिलदारसाहेब गांवांतील हालहवालासंबंधी आणि विशेषतः चोराचिलटांच्या नुकत्याच सुरू झालेल्या सुळसुळाटासंबंधी बोलूं लागले.

तहिसिलदार गेल्यानंतर आईला चोरांच्या सुळसुळाटासंबंधीच्या साऱ्या गोष्टी वडिलांनी सांगितल्या. आई बिचारी अगदीं भिऊन गेली. चोर येतील आणि गांवांतलीं घरें जाळून टाकतील असें आम्हांला सारखे वाटे. आग म्हटली कीं आईला तर दे माय धरणी ठाय असें होऊन जाई. तिला पाय अधू झाल्यामुळें धावतां येत नव्हतें म्हणून तिनें अशी धास्ती घेतली असावी.

नंतर वडिलांनी ती भयंकर बातमी सांगितली !—'बुआ'ला ते तहिसिलदारसाहेबांना देऊन टाकणार होते !—

त्या वेळी मला काय वाटलें असेल ह्याची तुम्हांला कल्पनाहि करतां येणार नाहीं !—पण कशालाच कांही इलाज नव्हता. कारण तहिसिलदारसाहेबांना जर 'बुआ'ला देऊन टाकलें नाहीं, तर आपण तिचा 'खातमा' करून टाकूं असें वडिलांनी निक्षून सांगितले होते.

—आणि 'बुआ'ला मला देऊन टाकावें लागलें !—

मी तहिसिलदारसाहेबांच्या डेऱ्याकडे (तंबूकडे) जाऊं लागलो. माझ्या मागून 'बुआ' येत होती. मी हळुहळू पाऊलें टाकीत चालत होतों. त्याच सुमारास आमच्या गांवीं एक सर्कस आली होती. वाटेवरच सर्कशीचा तंबू होता आणि त्या दिवशीं सायंकाळीं खेळ होता. माझे पाय सर्कशीकडे वळले. मी आंत शिरलों. 'बुआ' पायाशीं बसली होती. कुणाला ठाऊक कां, पण ती आज माझ्याशीं फारच लगट करीत होती. सर्कस संपली. मी पुन्हां चालूं लागलों. 'बुआ' पाठोपाठ

येत होती. मला रडूं येईल असें सारखें वाटत होतें–पण डोळ्यांत पाणी येऊं न देण्याचा माझा आटोकाट प्रयत्न चालू होता. मला रडतांना पाहून रस्त्यावरील येणारे-जाणारे लोक हसतील ह्याची लाज वाटत होती.

मी तहिसिलदारसाहेबांच्या तंबूजवळ जाऊन पोचलों. ते सहकुटुंब सहपरिवार आले होते. प्रथम तहिसिलदारणिबाईच पुढें आल्या. एक शब्दहि तोंडावाटें न काढतां मी 'बुआ'ला त्यांच्या स्वाधीन केलें. मी आंतल्या आंत रडत होतो. बोलण्यासाठी तोंड उघडलें तर उगाच हुंदका बाहेर पडायचा !–

माझी पाठ फिरली तेव्हां 'बुआ' जोरजोराने ओरडत होती. तें ओरडणें मला कितीतरी वेळ ऐकूं येत होते. मला तें असह्य झालें. झपाझप पाऊलें टाकीत मी चालू लागलों–अगदींच असह्य झालें तेव्हां धांवत सुटलों–

मी घरी आलों. 'बुआ' राही त्या जागीं स्वस्थ बसून राहिलों. बहिण आली. आई आली. सर्वांनी नाना प्रश्न विचारले. पण मी उत्तर दिलें नाही. अखेरीस मी खूप रडलों. रात्र झाली तेव्हां घरांत आलों.

त्यानंतर माझें आयुष्य बदललें. मी झपाट्यानें वाढत होतों हें पूर्वी सांगितलेंच. जगांत 'स्त्री' नांवाचा प्राणी असतो ह्याची मला जाणीव होऊं लागली. मी खूप वाचूं लागलों. कादंबऱ्यासुद्धां वाचल्या.

शिक्षण चालूंच होतें. इंग्रजी शिक्षणासाठी मला जवळच्या गांवीं पाठविण्यांत आलें. तेथे एक डॉक्टर राहत. त्यांची मुलगी आमच्याच शाळेंत शिकायला येई. ती मला फार फार आवडायची. पण ती कांहिशी बढाईखोर आणि बरीचशी गर्विष्ठ होती. त्यामुळे ती मला आवडेनाशी झाली. एकें दिवशी वर्गातच मी तिला पत्र लिहिलें आणि माझ्या 'बुआ'सारखेंच माझें तिच्यावर प्रेम असल्याचे कळविले. पण 'बुआ'ची मी तिच्याशी बरोबरी केली हें तिला आवडलें नाही. ती खूप रागावली. मला ती किती आवडते हे समजावून सांगण्याचा मी आटोकाट प्रयत्न केला–पण व्यर्थ !

दिवस जसजसे जात होते, तसतशी माझ्यावरची जबाबदारी वाढत होती. अभ्यास खूप करावा लागे. शाळा संपून घरी आलो तरी तीन तास अभ्यास करावा

लागे. तें पूर्वीचें खेडेगांवांतील जीवन—त्या जीवनापासून मी लांब-लांब जात होतो. ते निर्व्याज आयुष्य—त्या आयुष्यापासून मी दुरावत होतो. ह्या सर्व गोष्टीपासून मी दूर-दूर जात असलों, तरी अर्धवट आठवणाऱ्या सुंदर श्लोकासारखें तें पूर्वीचें जीवन मला आठवत नसे असें नाही. तें आठवे. मन शतशः विदीर्ण होई !

तहिसिलदारसाहेब त्याच गांवीं राहत. अधुनमधून दौऱ्यावर जात. पण त्यांची कचेरी त्याच गांवीं होती. कधींमधीं मी त्यांच्या घरावरून जात असे. तेव्हां 'बुआ' बागेंत चरत असतांना दिसे. मी शीळ घालायचा किंवा 'बुआ' अशी हांक मारावयाचा 'बुआ' माझ्या हांकेला 'बँ-एँ' करून उत्तर देई. माझ्याकडे येण्यासाठी तिची 'रस्सीखेच' सुरू होई. 'बुआ' मला विसरली, नव्हती हें पाहून मला आनंदाचें भरतें येई. मी जाऊं लागलों की 'बुआ' कितीतरी वेळें सारखी ओरडत राही. तें ओरडणें ऐकणारांना असह्य होई. 'बुआ' माझ्यामुळें कित्येकदा अशी ओरडत राहते हें कळून आल्यानंतर तहिसिलदारीणबाईंनी मला एक दिवस चांगलाच दम दिला. ती बाई उंच नि सडपातळ होती. ती रोगिष्ट असावी. तिच्या तोंडांतील वरचे दांत तुटले होते व त्या जागीं बनावट कवळी बसवली होती. ती रागावून जोरजोराने बोलूं लागली की प्रेताच्या सापळ्याचें तोंड हालत असल्यासारखें वाटे; आणि त्या हालणाऱ्या तोंडांतून अर्धवट चूळ तोंडांत ठेवून बोलत असल्यासारखा आवाज ऐकूं येई. मी अत्यंत दुष्ट आहे असें ती म्हणाली. मला फार वाईट वाटलें. त्या रस्त्याने पुन्हा न फिरकण्याचीहि तिनं मला ताकीद दिली.

जवळजवळ सहा महिने मी त्या रस्त्याने फिरकलो नाही. त्या दिवशी सहज तहिसिलदारांच्या घरावरून सायकल वळवली. माझी 'बुआ' बागेंत चरत होती. ती मजेंत होती हें स्पष्ट दिसत होते.

मी सायकलवरून खालीं उतरलों 'बुआ' अशी हाक मारली. तिने मान वर केली. 'बँ...एँ' केलें नाही की कांहीं नाही. ती पुन्हा चरण्यांत दंग झाली. मी पुन्हां हाक मारली—पण तिने ऐकलें नाही.

बागेच्या कुंपणाशीं मी विषण्ण मनःस्थितींत बसून राहिलों—मी खूपच दुबळा झालों होतों; हृदयाच्या आंतून—खूप आंतुन—रक्त वाहत असावें असें वाटलें.

बसल्या बसल्या शीळ घातली-पण 'बुआ' चरण्यांत गुंग होती! मी उठलों. सायकल घेतली. सरळ घरीं आलों. खूप खूप वाईट वाटत होतें.

ह्या गोष्टीचा आज मी ज्या वेळीं विचार करतों, त्या वेळीं खूप वाईट वाटतें. पूर्वीची जखम अजूनहि भरून आली नसल्याचा भास होतो. कांहीहि असो, एवढें मात्र खरें कीं 'बुआ'ला जर माझ्याजवळ राहूं दिलें असतें, तर मी आज दिसतों तसा दिसलों नसतों-माझ्यांत एकलकोंडेपणाचा संचार झाला नसता-कदाचित् मी निराळाच दिसलों असतों!-

पुन्हा थोडें मागे वळून पहा. जीवन-पथ असीम आहे. शेळ्या-मेंढरांच्या आणि कुत्र्या-मांजरांच्या अनेक कहाण्या आणि अनेक चित्रें सर्वांनाच दिसतील ...त्यांत प्रेम, वियोग आणि विस्मृति ह्या तिहींचा संगम झालेला असेल-हेंच जीवन!

# लांब लांब सावल्या !........................३

उन्हाळ्याचे दिवस होते. दादाच्या आणि माझ्या कॉलेजला सुटी असल्या-मुळें, आम्ही आष्ट्याला आमच्या घरीं आलों होतो. वर्षांतून जेमतेम दोनदां किंवा तीनदां आम्हाला घरीं जायला सवड सांपडायची; आणि त्यातल्या त्यांत उन्हाळ्या-च्या सुट्यांतच काय तें खूपखूप रहायला मिळत असे!

नेहमींप्रमाणें उन्हाळ्याच्या सुटींत आम्ही आष्ट्याला आलों होतो. आष्ट्याला आला कीं, दररोज सायंकाळीं नदीच्या काठून खूप लांबवर फिरायला जाण्याचा आमचा गित्याचा परिपाठ!

संध्याकाळ झाली होती. आमचा चहा झाला तेव्हां साडेपांच वाजून गेले होते. चहा घेतल्यानंतर दादानें आपला मलमलीचा अंगरखा अंगांत घातला, हातांत बारीकशी छडी घेतली आणि "नीरे चलतेस ना? आज निखिलला नाहीं घ्यायच. सोबत. चल आटोप लवकर!" असें म्हणत तो दारांत माझी वाट पहात उभा राहिला. कधींपासून बाहेर जाण्यासाठीं हपापलेली मी, आईचा निरोप घेऊन बाहेर पडलें.

आम्ही आमच्या घरासमोरचा टेकडीवजा भाग उतरुन नदीच्या कांठानें झपाझप् चालूं लागलों. सायंकाळच्या वेळीं नदीकांठीं खूप लांब लांब दिसणाऱ्या आमच्या सावल्या दररोज आमच्या बरोबर असत. त्या लांब सांवल्या पाहिल्या कीं मला किती तरी हंसू येई!

थोड्याच वेळानें आम्ही स्मशानभूमीच्या बाजूनें चालूं लागलों. समोर एका चिंचेच्या झाडाखाली आज एक नवीनच थडगें दिसलें. तें थडगें एका शुभ्र वस्त्रानें आच्छादिलेलें असून, त्यावर जाईचीं सुंदर पांढरी फुलं ओतलेली होती. किती भकास दिसत होतीं तीं थडग्यावरचीं फुलं!

—माझ्या मनांत चर्र झालें!

त्या दिवशीं सकाळीं निखिलला खेळवीत असतां, "निखिलच्या ओठांवर हंसतानां कशा जाई जुई फुलाच्या सारखं वाटत!" म्हणून कौतुकाने मी जे शब्द आईजवळ बोलून गेले, तेच शब्द त्या थडग्यावरचीं फुलं पहातांच माझ्या मनांत उभे राहिले! वास्तविक थडग्यावरचीं तीं जाईचीं फुलं आणि बाळाच्या ओठांवरील तीं काल्पनिक फुलं यांचा अर्थाअर्थी काय संबंध होता?

मी थांबले. माझे डोळे पाण्यानें भरून आले होते. "दादा, जाऊं आपण ... घरीं परत!" असें म्हणत मी मागें सुद्धां वळले.

दादाच्या सर्व प्रकार ध्यानांत आला माझ्या परत फिरण्याला मोडता घालण्यात कांहीं हांशील नाहीं, असें वाटून कीं काय "तुम्ही बायका बुवा भारी हळव्या!" असें म्हणत च कांहींसे हंसत तोही परत फिरला.

आह्मी परत येत होतो. परत येत असतां मी दादाशीं एका शब्दानेही बोललें नाहीं. फिरायला जाते वेळीं आमची सोबत करणाऱ्या त्या लांब लांब सावल्या आतां अंधार पडल्यामुळें दिसत नव्हत्या !

—२—

वरील गोष्टीला जवळ जवळ एक वर्ष होत आलें असेल. आह्मी नागपुरास होतो. उन्हाळ्याच्या सुट्या आतां फक्त पंधरा दिवसांवर होत्या. एका पंधरवाड्या-नंतर आपण आपल्या घरीं जाऊं आणि निखिलशीं खूप खूप बोबड्या बोलांनीं बोलूं, अशा विचारांत मी दंग होऊन गेलें होते.

एक दिवस सकाळीं दादा तानडीनें माझ्या खोलींत आला आणि ह्मणाला, " कांहीं झालं तरी आज आपण आष्ट्याला गेलच पाहिजे "

मी तर अगदी भांबावन गेलें. दादा येतो काय अन् सांगतो काय ? दादानें माझ्या हातांत एक पत्र दिलें. निखिल अत्यावस्थ असून मला आणि दादाला तावडतोब निघून येण्याविषयीं बाबांनीं लिहिलें होतें !

त्याच दिवशीं दुपारच्या गाडीनें आह्मी आष्ट्याला जायला निघालों. आष्ट्याला संध्याकाळीं आह्मी जाऊन पोंचलों. पण—

—पण काय !—

आष्ट्याचें घर ह्मणजे शोकसागरच झालेलें होतें ! आम्हा दोघांना पाहून आई आणि बाबा दुःखातिरेकानें ओरडले, " आपला निखिल गेला ! "

माझ्या पायाखालील जमीन दुभंगून मी पाताळांत जात आहे कीं काय, असें मला वाटलें ! निखिलचें प्रेत जमिनीवर पडलें होतें. ज्या तापानं त्याचा बळी घेतला त्याच तापानं त्याच्या ओठांवर डवरलेलीं जाईचीं फुलं आतां शीर्ण करून टाकलीं होतीं !

निखिलच्या प्रेतयात्रेसोबत मी सुद्धां स्मशानभूमींत गेलें होतें. दादाच्या हातांवर निखिलचें शव होतें. दादा मंद मंद पावलें टाकीत चालत होता. सायंकाळच्या वेळीं लांबवर पडणाऱ्या आमच्या सावल्या आमच्या सारख्याच मंदगतीनें आमची साथ करीत होत्या !

—सायंकाळ संपून रात्र झाली होती.—

निखिलच्या प्रेतावर शेवटचा दगड ठेवला आणि त्याला कल्पांतापर्यंत तेथेंच झोपत ठेऊन आह्मी खिन्न मनस्थितींत परत फिरलों.

आह्मी परत फिरलों त्या वेळीं आमच्या त्या लांब लांब सावल्या आह्माला परत दिसल्या नाहींत. अंधाराच्या पोटांत त्या गडप झाल्या होत्या; आणि काळाच्या पोटांत आमचा निखिलही गडप झालेला होता !

—३—

उन्हाळयाची सुटी असल्यामुळें अद्याप आह्माला आश्रमालाच दोन महिनें काढावयाचे होते. बाबांच्या मागें लागून मी निखिलला पुरलेल्या ठिकाणीं एक लहानसे थडगे बांधून घेतलें होतें. आश्रमाला असते त्या वेळीं दादासोबत दररोज निखिलच्या थडग्याकडे फिरावयाला जायचा माझा नेम असतो. निखिलच्या बाललीला आठवून मी दर दिवशीं त्याच्या थडग्यावर अश्रू ढाळते. थडग्यावर अश्रु ढाळींत असतां विचार येतो कीं, थडग्याच्या आंत अक्षय निद्रा घेणाऱ्या माझ्या निखिलच्या ओंठावरलि ती शीर्ण जाईची फुलं माझ्या अश्रूंच्या सिंचनानं पुन्हा कधीं फुलतील कां !—पण किती वेडी आहे मी !—किती वेडा विचार आहे हा ! शीर्ण—करपलेली—फुलं पुन्हां कधीं फुलतात कां !—

—बाळाच्या थडग्याकडे जातांना आह्माला आमच्या त्या लांब लांब सावल्या दररोज सायंकाळीं दिसतात. आह्माला गंमत वाटते.—पण परत येतांना अंधाराच्या पोटीं त्या सावल्या विलीन झालेल्या पाहिल्या कीं कसेसेच होऊन जाते ! ! !

# हिरवळीवरील साऊली !........................४

रात्रीं झोंपीं जाण्यापूर्वी सर्व मुलं अंगणांत गोळा होत आणि नंतर कहाण्या सांगण्यास सुरुवात होई. नित्याचा हा क्रम. हिवाळा असला कीं शेकोटी पेटलेली असावयाची–तिच्याभोंवतीं सर्व बसत. उन्हाळा असला कीं चांदण्यांत बसून कहाण्या ऐकण्यासारखी दूसरी गंमत नव्हती. पंचाईत पडे ती केवळ पावसाळ्यांत !...

ते हिंवाळ्याचे दिवस होते. नित्याप्रमाणें अंगणांतील शेकोटीभोंवतीं मुले गोळा झालीं. कहाण्या नि गप्पांस ऊत आला. मनांत येईल तें एकाने दुसऱ्यांस सांगावें, इतरांनीं ऐकावें. कहाणी कशीही असली, तरी ती अमुकाला आवडली नाहीं असें मात्र कधीं होत नसे.

कहाणीचा लाज सदैव एकच असावयाचा. शब्दांत काय तो फरक–आणि कहाणी सांगणारा प्रत्येक वेळीं निरनिराळा. हेंच दररोजचें नाविन्य. सांगितल्या जाणाऱ्या गोष्टी बहुधा राजा–राणीच्याच असत. प्रत्येक गोष्ट, 'एक होता राजा नि एक होती राणी.... ' पासून सुरूं व्हावयाची आणि '...नंतर ते सुखाने राहूं लागले ' एवढ्यावर संपावयाची. कहाणीचा पर्यवसाय दुःखद झालेला कोणी ऐकला नव्हता. त्या कहाण्यांचें हें एक वैशिष्ट्य होते. त्या मुलांना त्यांचें सारें जीवन म्हणजे आनंदाचा–नाचण्याबागडण्याचा–एक दिवाळसण वाटे ! त्यांचें नित्याचें जीवन फुलासारखे होतें. प्रकाशांत फुलावयाचें आणि प्रकाशांतच झोंपीं जायचें. कधीं कधीं आपापसांत त्यांच्या कानगोष्टी चालत. त्या वेळीं ओंटावरचें शब्द ओंठावरच रहात. थोडेसे ऐकूं येई आणि बरेंचसे ऐकूं येणें कठीण होई. कांहीं शब्दांचा अर्थ लक्षांत येई आणि कांहीं शब्द निरर्थक वाटत. कहाणीला सुरूवात होई ही गोष्ट खरी–पण तिला ना आदि ना अंत ! कित्येकदा ते सर्वच एकदम बोलूं लागत–पण गंमत

अशी कीं, त्यामुळें एकमेकांचें बोलणें एकमेकांना समजायला काडीचीही अडचण पडत नसे. कहाणींतील विस्मय—त्या विस्मयाच्या आनंदानें त्यांचें चेहेरे प्रफुलित होत आणि सुंदर स्वर्गीय प्रकाश फांकल्यासारखें वाटे. कोणताही शब्द त्यांना कधीं क्लिष्ट वाटला नाहीं—समजण्यास अडचण पडली नाहीं. प्रत्येक कहाणी अगदीं खरोखरीची—डोळ्यासमोर ठेवलेल्या चित्रासारखी त्यांना वाटे आणि कहाणीचा शेवटही मोठा शानदार होई.

तीं एकंदर चार मुलें. सर्वच लहान होतीं. सर्वांत धाकटा चार वर्षांचा आणि सर्वांत मोठी बहीण अकरा वर्षांची. त्यांच्या रूपरंगांत विलक्षण साम्य होतें. सर्वांचे चेहेरे लांबट आणि डोळे मोठे होते. त्या टपोऱ्या डोळ्यांतून त्यांचा बालस्वभाव नेहमींच डोकावतांना दिसे.

त्या दिवशीं रात्रीं, एका अज्ञात ठिकाणाहून एक विचित्र बातमी ऐकूं आली. नेहमीच्या आनंदी वातावरणावर विरजण पडलें. कसली तरी काळीशार छाया पसरली. नेहमींचा आनंद मावळला. कहाण्या सांगणें थांबलें. गप्पागोष्टींना खंड पडला. त्या छोट्याशा नंदनवनाला वणवा लागल्यासारखें सर्वांना वाटलें. पोस्टमन एक पत्र देऊन गेला. त्यांत लिहिलें होतें 'मुलांचे वडील कुठल्याशा युद्धक्षेत्रांत मारले गेले!'

ह्या बातमीमुळें त्या मुलांसमोर एक अनोळखी, अज्ञान आणि बुद्धीला न पटणारा प्रश्न 'आ' वासून उभा राहिला. त्या प्रश्नाला तसें कांहींच स्वरूप नव्हते. 'मारले गेले!'—म्हणजे काय झाले? 'मारले जाणे' ही काय आपत्ति आहे?—ह्या गोष्टीचा संबंध देवळासमोरील यात्रेच्या गडबडीशीं नव्हता... सडकेवरील गप्पांशीं नव्हता... घराशीं नव्हता... शाळेशी नव्हता... किंवा कोणत्या एकाद्या कहाणीशींही नव्हता!—'मारले जाणें'—खरोखरीच ही एक नवीन अद्भुत चीज होती!

होय!—त्यांचे वडील युद्धक्षेत्रांत 'मारले गेले'! मुलांसमोर रहस्यमय पेंचप्रसंग निर्माण झाला. त्यांत आनंदाचा लवलेश नव्हता किंवा त्यांत त्यांना दुःखही झालेलें दिसलें नाहीं. भोळ्याभाबड्या मुलांची विचारशक्ति कुंठित झाली!

"तर मग बाबा परत येणार कधीं ?" सर्वांत लहान भावाने विचारलें. त्याचें वय चार वर्षांचे असेल. पण प्रश्न विचारतांना त्याच्या टपोऱ्या डोळ्यांतून आश्चर्य ओसंडत होतें.

त्याचा प्रश्न ऐकून मोठी बहीण थोडी रागावली आणि त्याला कोंपरानें ढकलीत म्हणाली, "अरे वा रे वा !–ते मारले गेले आहेत ना ?–मग परत कसे येतील ?"

हें ऐकतांच सर्वांनाच आश्चर्य वाटलें. कांही वेळ कुणीच कुणाशीं बोललें नाहीं. समोर दिसणारी पडकी काळी भिंत, ती सुद्धां कांहीं सुचवीत नव्हती–त्यामुळें तीं मुलें गांगरून गेलीं. समोरची काळी भिंत ? –त्या पलीकडचें दिसणें त्यांना शक्य नव्हतें !

मोठा भाऊ जोराने म्हणाला, "बस्स !–ठरलं !–मी सुद्धां लढाईवर जाणार !"–जणूं काय त्याचा विचार निश्चित झाला होता. त्या विचारांत कशाचीच उणीव नव्हती–आणि त्यासंबंधीं विशेष बोलण्याचीही आवश्यकता नव्हती.

धाकटा भाऊ म्हणाला, "...पण...पण...तूं तर अजून फार लहान आहेस !"–तो नेहमीं खाकी पोशाखांत शिपायासारखा राही.

धाकटी बहीण मात्र सर्वांत भारी भित्री नि अबोल होती. डोक्याशीं एक गांठोडे घेऊन आणि पायांपासून डोक्यापर्यंत पांघरूण ओढून ती निजली होती. तिनें तसेंच पडल्या पडल्या हळूंच विचारले, "–पण काय रे,......लढाई कशी असते ?...मला सांगशील तर ?"

मोठा भाऊ मोठेपणाचा आव आणून सांगू लागला, "हं. ऐक तर माणसें हातांत चाकू घेतात आणि एकमेकांना भोंसकत सुटतात. तरवारीने एकमेकांना कापून टाकतात आणि कधीं कधीं बंदूकहि उडवितात...बस्स...त्यालाच लढाई म्हणतात...समजलीस ?"

'पण काय रे, ते एकमेकांना काय म्हणून भोंसकतात?" धाकटीने विचारलें.

"आपल्या राजासाठीं." मोठा म्हणाला.

हें ऐकून मात्र सर्वच स्तब्ध झाले.

त्यांच्या डोळ्यासमोर सुदूर अंधुक प्रकाशांत कांहींतरी शक्तिशाली आभा दिसूं लागली. कुणीं बोलत नव्हतें. कुणीं हालत नव्हतें. श्वासोच्छ्वासाचा सुद्धां आवाज होऊं देणें त्यांना बरें वाटत नसावें. स्मशानासारखी शांतता. त्या भयाण शांततेंत, समोरच्या भिंतीप्रमाणेंच तीं मुलें निश्चल बसलीं होतीं.

मोठ्या भावानें आपल्या डोक्यांत निर्माण झालेले सर्व विचार गोळा केल्यासारखे केलें आणि डोकें हालवीत तो म्हणाला, "–हं!–शत्रूशीं लढण्यासाठीं, भोंसकाभोंसकी करण्यासाठीं, मी लढाईवर जाणार ?–"

धाकट्या बहिणीनें पुन्हां बारीक आवाजांत प्रश्न केला, "–पण काय रे, शत्रू कसे असतात...त्यांना मोठमोठीं शिंगें असतात होय ? "

मोठा भाऊ मोठ्या आवाजांत आणि कांहींसें रागांत उत्तरला "हो–हो–हो!–मोठाली शिंगें असतात !–शिंगें नसतीं तर तो शत्रू कसा झाला असता ?"

हें ऐकून सर्वांत धाकटा भाऊ मात्र चाट पडला. त्या प्रश्नाचें उत्तर त्याला स्वतःला सुद्धां ठाऊक नव्हतें. नंतर कांहीसा अडखळत तो म्हणाला, " शिंगें ?... शिंगें ?...त्याला शिंगें नसावींत..."

थोरली बहीण आपली अक्कल लढवीत म्हणाली, " त्याला शिंगें कुठून आलीं ?–तो सुद्धां आपल्यासारखाच माणूस असतो ना ? "–नंतर कांहीसा विचार करून म्हणाली, "हो–हो–पण त्याला जीव खचित असेल!"

बऱ्याच वेळानंतर धाकट्यानें विचारलें, 'पण लढाईत मरतात म्हणजे खाली पडत असतील ?–मग ते पुढें पडतात की मागें ? " आपल्या प्रश्नाचा नीट खुलासा व्हावा म्हणून त्यानें स्वतः पडून दाखविलें.

मोठ्यानें नुसता खुलासा केला. " ते त्यांचा जीव घेतात आणि मारतात–"

छोटा म्हणाला, " बाबा म्हणत होते, परत येतांना आपण एक बंदूक आणणार आहोंत. ती बंदूक ते आपल्याला देणार होते."

थोरली बहीण रुक्ष स्वरांत म्हणाली, " ते तर मारले गेले...मग बंदूक कशी आणतील ?"

" जिवानिशी. मारले गेले ?"

" हो–हो—जिवानिशी !"

भाबड्या लहानग्यांचे डोळे–त्यांची दृष्टि–खिन्न झाली ! त्या खिन्न दृष्टींत अंधार दिसला ! विचार चालू झाले-पण त्या विचारांची धांव फार दूरवर पोंहोचूं शकली नाही–कल्पनेची भरारी पंख कापलेल्या पक्षाप्रमाणें खुंटली !

सारें स्तब्ध झालें. समोरची काळी पडकी भिंत अधिकच भयाण दिसूं लागली. ती भिंत एकाद्या पिशाच्चाप्रमाणें त्या अंधुक प्रकाशांत उभी होती !

त्याच वेळी झोपडीबाहेर एकीकडे म्हातारे आजोबा आणि आजी बसली होती. सूर्यास्ताची किरणें अंगणांतील हिरवळीवर पडली. सर्वत्र शांतता. पक्ष्यांचा किलबिलाटही शांत झाला होता. पडक्या भिंतीची सायंकाळच्या प्रकाशांतील लांब साऊली हिरवळीवर पसरली. ती अधिकच भयाण भासली !

ती दोघें वृद्ध खाली मान घालून शेजारीं शेजारीं बसली होती. त्यांनी एकमेकांचे हात घट्ट धरले होते. गेले कित्येक दिवस ते शेजारीं शेजारीं बसले नव्हते–एकमेकांच्या हाताला स्पर्श केला नव्हता. सायंकाळच्या पिंवळसर प्रकाशाकडे ते डबडबलेल्या डोळ्यांनी पहात होते. कुणींच कुणाशीं बोलत नव्हतें. अंधःकार वाढत होता. वाढत्या अंधाराच्या उदरांत पडक्या भिंतीची लांब साउली विलीन झाली होती.

## मातृपदाविण ........................................ ५

त्या वर्षीचें काँग्रेस अधिवेशन लाहोर येथें भरणार होतें. अधिवेशनास सुरुवात होण्यापूर्वी तीन–चार दिवस, मी माझ्या पत्नीसमवेत मीरतहून लाहोरला येऊन पोंचलों. सोबतच माझा चार वर्षे वयाचा मुलगाहि होता. काँग्रेस कँपमध्यें जाऊन रहण्याचा माझा प्रथम विचार होता. परंतु बरोबर बायकामुलें असल्याकारणानें, त्यांची कदाचित् गैरसोय होईल असें वाटून मीं माझा विचार बदलला आणि एका मित्राकडे जाऊन उतरलों. माझे हे मित्र आर्यसमाजी होते. ते मुळचे दिल्लीचे राहणारे असले, तरी व्यापारानिमित्त लाहोरला येऊन राहिले होते.

काँग्रेसमुळें साऱ्या शहरांत खूपच खळबळ उडालेली होती. काँग्रेस–नगरमधलि उत्साह तर कांहीं विचारायलाच नको. दररोज सायंकाळीं हजारों स्त्रीपुरुष तेथें येऊन एकत्र होत असत. निरनिराळ्या सभामंडपांत निरनिराळ्या संस्थांचीं वार्षिक अधिवेशनें चालू होतीं. प्रदर्शनाच्या जागीं मात्र प्रेक्षकांची विशेष गर्दी दिसावयाची. कोणत्याही सामाजिक किंवा राजकीय संस्थेशीं अगर चळवळीशीं माझा संबंध नसला, तरी केवळ कुतूहल म्हणून एका प्रेक्षकाच्या नात्यानें मी तेथें गेलेलों होतों व त्या दृष्टीनें प्रत्येक गोष्ट विशेष आस्थापूर्वक पहावी असें मला वाटत असे.

त्या दिवशीं मी माझी पत्नी कल्याणी आणि मुलगा किशोर यांच्या सोबत प्रदर्शनाच्या मंडपांत भटकत फिरत होतों. चालतां चालतां आम्हीं एका रेशमी कापडाच्या 'स्टॉल' शेजारीं जाऊन उभे राहिलों. रेशीम तयार करण्याची क्रिया तेथें दाखविली जात असल्यामुळें त्याकडे कुतूहलानें पहाणारी बरीचशी मंडळी तेथें उभी होती. एका जागीं बरेचसे रेशमाचे किडे कसलीशीं हिरवी पानें खात असलेले दिसत होते. कल्याणी अत्यंत कुतूहलानें त्या किड्यांकडे पहात होती व मला

अधूनमधून नाहीं नाहीं ते प्रश्न विचारून भंडावून सोडीत होती. मीसुद्धां तिच्या प्रश्नांचीं यथाशक्ति उत्तरें देत होतों. इतक्यांत एकाएकीं कुणीतरी माझ्या पाठीवर जोराची थाप मारली. मी आश्चर्यचकित होऊन मागें वळून पाहिलें. अंगानें सशक्त, दिसण्यांत देखणा आणि संपूर्ण खादीचीं वस्त्रें परिधान केलेला एक तरुण माझ्या-कडे पाहून हंसत होता. त्या तरुणाची चेहेरेपट्टी मला पूर्वी कधीं तरी पाहिल्या-सारखी वाटली. परंतु कांहीं केल्या ओळख मात्र पटेना. भ्रांत अवस्थेंत मी त्याच्या-कडे कितीं तरी वेळपर्यंत टक लावून पहात होतों. त्यानंतर त्यानें पुन्हां माझ्या पाठीवर जोराची थाप मारली आणि एखाद्या लहान मुलाप्रमाणें मला गदगदा हालवीत म्हटलें, ' काय, अजून नाहीं ओळखलं मला ? '

माझ्या डोक्यांत एकाएकीं चक्क प्रकाश पडला. मी त्याला ओळखलें, आणि ओळख पटतांक्षणीच कांहींशा आश्चर्यानें म्हणालों, ' कोण, उल्हास ? '

आणि उल्हासही तितक्याच आश्चर्यानें म्हणाला, ' अरे कुमार, तूं इकडे कुठें ? आजकाल कुठें असतोस ? काय करतोस ? '

ज्या वेळीं मी मॅट्रिकमध्यें होतों, त्याचवेळीं उल्हासहि माझ्याच वर्गात शिकत होता. त्यानंतर तो दिल्लीला निघून गेला. मॅट्रिकची परीक्षा आटोपल्यानंतर आजच काय तें मीं त्याला प्रथम पाहिलें.

" मी कानपूरला होतों. तेथील ' यूथ लीग ' तर्फे नवभारत–सभेच्या अधि-वेशनांत भाग घेण्यासाठीं मला पाठविण्यांत आलें आहे. कालच्या सभेंत माझें भाषण झालें. खूप गर्दी होती. सर्व तरुण लोकांत नव–भारत-सभेसंबंधी आत्यंतिक प्रेम असल्याचें दिसत आहे. " उल्हास सांगूं लागला.

' अस्सं, तर तू कॉंग्रेसचा ' डेलिगेट ' म्हणून आला नाहींस वाटतें ? ' मी विचारलें.

' हं, तसं म्हटलं तर मी कॉंग्रेसचा प्रतिनिधिसुद्धां आहेच. परंतु आमचा पंथ कॉंग्रेसहून अगदींच निराळा आहे. खरी गोष्ट अशी कीं, कॉंग्रेसची तत्त्वें आम्हांला मुळींच मान्य नाहींत. कॉंग्रेसमध्यें असलेलें सर्व पुढारी लोक ' कॅपिटॅलिस्ट ' आणि ' बुर्जवा ' आहेत. श्रमजीवि आणि शेतकरी ह्यांच्या स्थितीकडे ह्यांचे मुळीच लक्ष नाहीं. ह्याशिवाय दुसरी गोष्ट अशी कीं, ती सर्व मंडळी अत्यंत भेकड आहेत. सरकारचा रुख पाहूनच त्यांच्या राजनीतींत फेरबदल होत असतो. महात्मा गांधींच्या राजनैतिक सिद्धांताशीं आमचा पूर्ण विरोध आहे. "

अत्यंत उत्सुकतेनें तो सांगत असलेल्या गोष्ट मीं ऐकत होतों. उल्हासकडे पाहून मला अजूनहि आश्चर्य वाटत होतें. केवढा बदल झाला होता, त्याच्या पूर्वीच्या अल्लड वृत्तींत !

मी चिकित्सेनें विचारलें, ' कॉंग्रेसपुढाऱ्यांपेक्षांहि तुमचा दर्जा श्रेष्ठ आहे असें का वाटतं तुह्माला ? '

माझा प्रश्न ऐकून त्याची मान कांहींशी ताठर झाली आणि तो म्हणाला, ' कां नाहीं ? आमचें ध्येय आणि उद्देश त्यांच्यापेक्षां कितीतरी उदार आणि उन्नत स्वरूपाचें आहेत. ह्यावेळीं जर भारतवर्षाच्या शासनाचा भार त्यांच्यावर सोंपविण्यांत आला, तर केवळ कांहीं विशिष्ट श्रेणीच्या लोकांचेंच कल्याण होऊं शकेल. परंतु अत्याचारपीडित साधारण श्रेणीच्या लोकांनाच स्वराज्याचे सर्व हक्क उपभोगण्याचा नैतिक व न्याय्य अधिकार आहे, असें आमचें ह्मणणें आहे. कांहीं असो, येथें उभें राहून मी तुला ह्या सर्व गोष्टी समजावून सांगू शकणार नाहीं. आज सायंकाळीं तूं आमच्या कॅंपमध्यें किंवा नव-सभेच्या सभागृहांत नाहीं का येऊं शकणार ? ' ह्यानंतर त्याने कल्याणीकडे पहात, ' ही कोण ' असें खुणेनें विचारलें. त्या सर्वांची मी उल्हासशीं ओळख करून दिल्यानंतर, तो गालांतल्यागालांत हंसला आणि त्यानें पुन्हा माझ्या पाठीवर कांहींशा मिस्किलपणानें थाप मारली.

' अरे, पण उल्हास, तुझं लग्न झालं कीं नाहीं ? ' मी हंसत हंसत विचारलें.

' नाहीं. आह्मी लोक लग्न करीत नाहीं ! '

'आम्ही लोक!—म्हणजे यूथलीगचे मेंबर होय!'

'नाहीं. आमचें आणखी एक विशेष ध्येय आहे. पण त्यासंबंधी मी तुला ह्यावेळीं कांहींच सांगू शकत नाहीं. हं, चल सांग, मला कुठें भेटणार तें!'

'आज मला तुला भेटतां येणें शक्य नाहीं. उद्यां मात्र सभागृहांत अवश्य भेटेन.'

'ठीक आहे. मी व्यासपीठाजवळ उभा असेन' असें म्हणून उल्हास निघून गेला.

तो जाऊं लागला, तसाच त्याच्या पाठीमागून संन्याशासारखी भगवीं वस्त्रें परिधान केलेला एक इसमहि चालूं लागला. तो संन्यासी बराच वेळपासून आमच्या पाठीशीं उभा राहून, स्टॉलवरील रेशमी कपडे पहात होता. उल्हासनें मागें वळून त्या संन्याशाकडे एकवार पाहिलें. परंतु लगेंच त्यांच्यासंबंधीं औदासीन्य दर्शवीत तो आपली वाट चालूं लागला.

उल्हासच्या गोष्टी ऐकून मी आश्चर्यचकित झालों होतों. बराच विचार करूनहि त्याचीं तत्त्वें माझ्या लक्षांत येऊं शकलीं नाहींत. महात्मा गांधीसारख्या जगद्वंद्य व्यक्तीला विरोध करणारा आणि काँग्रेस ही संस्था भांडवलवाल्या लोकांची मिरास आहे असें म्हणणारी उल्हाससारखी व्यक्ति, एक तर देशद्रोही असावी किंवा......! परंतु शेवटपर्यंत मी विचारच करीत राहिलों.

दुसरे दिवशीं ठराविक वेळेवर मी नव–भारत–सभेच्या सभागृहांत पोंचलों. एक तरूण युवती व्यासपीठावर उभी राहून जोरदार शब्दांत भाषण करीत होती. तिच्या तोंडचीं चार–सहा वाक्यें ऐकतांच माझें धाबें दणाणलें! उल्हासपेक्षांहि तिचे विचार अधिक उग्र आणि सुस्पष्ट होते. ती एखाद्या लांबसडक वेताच्या छडी-प्रमाणें व्यासपीठावर उभी होती; आणि तिच्या तोंडून बाहेर पडणारा प्रत्येक शब्द श्रोत्यांच्या हृदयांवर घणाप्रमाणें प्रभाव पाडीत होता. ती तरुणी विशेष सुंदर होती असें नाहीं. परंतु त्वेषाची दाट छटा असणाऱ्या तिच्या चेहेऱ्यावरील

गंभीर भाव अत्यंत आकर्षक होता, एवढें मात्र खरें! इतक्यावरहि माझें मन मला सांगत होतें कीं, त्या तरूणीच्या हावभावांत बरीच कृत्रिमता सामावलेली आहे.

व्यासपीठाच्या एका कोपऱ्याशेजारी बसलेल्या उल्हासनें मला पहातांक्षणींच तो माझ्याकडे आला.

'तुझं व्याख्यान झालं का?' मी विचारलें.

'नाहीं. माझं व्याख्यान उद्यां होणार आहे' उल्हास म्हणाला.

'ही बाई कोण?

'मीनाक्षी! आम्हां मंडळींत तिचें बरेंच प्रभुत्व आहे.'

हें सर्व सांगत असतां, त्याच्या चेहेऱ्यावर एक प्रकारचा अहंभाव झळकत होता. परंतु कुणास ठाऊक कां, पण त्याच्या ह्या वृत्तीकडे पाहून मला एक प्रकारची चीड आली आणि मी म्हणालों, 'एका सामान्य स्त्रीनें तुम्हांला परिचालित करावें ह्या गोष्टीची तुम्हांला लाज कशी नाही वाटत?'

'लाज?-आणि ती काय म्हणून! स्त्री आाणि पुरुष ह्यांत आमच्या दृष्टीनें मुळींच भेदाभेद नाहीं. परंतु कुमार, ह्या स्त्रीचं भाषण ऐकूनच तू हिची परिक्षा करूं नकोस. इतके दिवस मी हिच्यासोबत राहूनहि मला तिला नीट ओळखतां आलें नाहीं.'

माझी उत्सुकता अधिकाधिक वाढूं लागली. उल्हासच्या सांगण्यांत कांहीं तरी महान् रहस्य असावें अशी मला शंका आली; आणि मी म्हणालों— 'तूं तिच्या सोबतच राहतोस, तर माझी सुद्धां ओळख करून दे कीं तिच्याशीं?'

'कां नाहीं? मोठ्या आनंदानें! आजच सायंकाळीं तुझी व तिची गांठ घालून देईन.' ह्या बाबतींत उल्हास विशेष उत्साहित दिसला.

इतक्यांत कांहीं लोकांत भांडण चालूं झाल्याचा आवाज ऐकूं आला. मागें वळून पहातो तों, काल रोजीं उल्हासच्या मागून जाणारा संन्याशी दारावरील

स्वयंसेवकाबरोबर भांडत असलेला दिसला. स्वयंसेवक म्हणत होता, 'निकलो बदमाष! तुम सी. आय. डी. के आदमी हो.' परंतु तो आपण संन्याशी आहोंत ह्या एकाच गोष्टीवर अडलेला होता. ह्या भांडणाचें रूपांतर मारामारींत होतें कीं काय असें वाटूं लागलें. अखेरीस त्या स्वयंसेवकानें त्याला दाराबाहेर घालविलें. सभेंत एकच हुल्लड उडाली. सर्वजण उठून उभे राहिले. ह्या गडबडींत उल्हास कुठें गायब झाला कुणास ठाऊक. मी त्याला बराच वेळ शोधलें; पण उपयोग झाला नाहीं. शेवटीं निराश होऊन मी परतलों. दुसऱ्या दिवसापासून कुणाला ठाऊक कां, पण माझी नव-सभेच्या सभागृहाकडे जाण्याची मुळींच इच्छा झाली नाहीं; आणि उल्हासहि मला भेटला नाहीं.

*　　　*　　　*

वरील गोष्टीला चार महिने होऊन गेले असतील. मी मीरत येथेंच होतों. पानपट्टीच्या एका दुकानावर उभा असतां, मला एक सूटबूटधारी व्यक्ति हातांतील काठी मोठ्या ऐटीनें फिरवीत जात असतांना दिसली. कांहीं वेळ मी त्याच्या रुबाबाकडे पहातच राहिलों. तो माझ्या जवळून पुढें निघून गेला. कांहीं वेळ-पर्यंत मलासुद्धां त्याची विस्मृति झाली. परंतु अचानक विजेच्या प्रकाशाप्रमाणें माझी स्मृति जागृत झाली. ज्या 'संन्याशा'ला मी लाहोर कॉंग्रेसमध्यें पाहिलें होतें, त्या संन्याशाचा तोंडावळा आणि ह्या सूटबूटधारी व्यक्तीचा तोंडावळा अगदीं सारखा होता. लागलींच मला उल्हासची आठवण झाली, आणि विचार आला कीं तो सध्यां येथें तर आला नसेल ना!

दुसरे दिवशीं सायंकाळीं कांहीं कामासाठीं मला टाऊनहॉलकडे जावयाचें होतें. चालतां चालतां थकवा आला म्हणून मी रस्त्याच्या बाजूला असलेल्या पार्कमध्यें शिरलों. इतक्यांत कांहीं दूर अंतरावर एका झाडाखालील बांकावर एक तरूण पुरुष व एक तरूण स्त्री बसलेली मला दिसली. त्या स्त्रीनें निळ्या रंगाचें पातळ परिधान केलें होतें. त्यांच्याजवळ दुसऱ्या एका बांकावर मी जाऊन बसलो. आश्चर्याची गोष्ट अशी कीं, बाजूच्या बांकावर बसलेला इसम माझ्या-जवळ येऊन बसला आणि माझ्या पाठीवर थाप मारून म्हणाला, 'कसं काय कुमार!'

मी दचकलो! माझी दृष्टि कांहींशी क्षीण असल्याकारणानें, त्या अंधुक प्रकाशांत मी त्या गृहस्थाला प्रथम ओळखूं शकलों नाहीं. नंतर मी म्हणालों, 'माफ कर हं उल्हास! माझे डोळे थोडे क्षीण असल्याकारणानें, मी तुला ओळखूं शकलों नाहीं, केव्हां आलास इथं?'

'तीन दिवस झाले.'

'आणि ह्या बाई कोण?'

'त्याच...मीनाक्षीबाई!'

'अस्सं?'

'चल कीं तुझी ओळख करून देतों.'

'नको, आज नको. पुन्हां केव्हां तरी...'

परंतु माझें वाक्य पूर्ण होण्यापूर्वींच त्यानें माझा हात धरून मला फरकटत मीनाक्षी बसली होती त्या बांकाकडे नेलें.

माझ्या संकोची दृष्टीकडे पाहून मीनाक्षीबाई हंसली, पण तिच्या हंसण्यांत स्नेहभाव स्पष्ट दिसत होता. तिनें शांत, स्निग्ध स्वरांत विचारलें, "आपण इथं काय करतां?"

'वकीली!' मी म्हणालों.

ह्यावर मल्लिनाथी करण्याच्या उद्देशानें उल्हास म्हणाला, "ऐकलंस कां मीनाक्षी, कुमार पोटासाठीं वकिलीचा धंदा करीत नाहीं. तो एक भला मोठा भांडवलदार आणि फिलॉसफरसुद्धां आहे म्हटलं!"

'भांडवलदार आणि फिलॉसफर!' मीनाक्षीच्या ह्या वाक्यांत तीक्ष्ण व्यंगोक्ती भरलेली होती. कांहीं वेळ थांबून ती पुन्हा म्हणाली, 'मिस्टर कुमार, तुमचा ईश्वरावर विश्वास आहे का? अगदी आपल्या अंतःकरणाला स्मरून उत्तर द्या.'

मीनाक्षीचा हा अचानक प्रश्न ऐकून मी कांहींसा गांगरल्यासारखा झालों. परंतु स्वतःला सावरीत मी म्हणालों, 'ईश्वरावर माझा पूर्ण विश्वास आहे ही गोष्ट खरी असली, तरी अंतःकरणासंबंधीं मात्र मी कधींच विचार केलेला नाहीं.'

'हं!' असा उद्गार काढून ती कांहीं वेळपर्यंत गंभीर होऊन स्वस्थ बसली. त्यानंतर थोड्याच वेळानें तिनें दुसरा प्रश्न विचारला, 'बरं, पाप–आणि स्वर्ग–नरक ह्या गोष्टींवरहि तुमचा विश्वास आहे?'

'पाप आणि पुण्य ह्या गोष्टी मानीत असलों, तरी स्वर्ग आणि नरक ह्यासंबंधीं मात्र मी विचार केलेला नाहीं' मी म्हणालों.

'उदाहरणार्थ, तुम्ही एक भांडवलदार आहांत. तुमच्याजवळ हें जें सर्व द्रव्य सांठलेलें आहे, तें परोक्ष किंवा अपरोक्ष रीत्या गरीबांचें रक्त शोषण करूनच तुम्ही सांठविलें आहे–नाहीं का? जर एकाद्या व्यक्तीनें तमचें हें द्रव्य लुटलें आणि गोरगरीबांना वांटून दिलें, तर ह्या कृतीला तुम्ही काय म्हणणार–पुण्य कीं पाप?'

मीनाक्षीचा हा प्रश्न ऐकून मी दिङ्मूढ झालों. तिच्या बोलण्यांत कोणत्याच प्रकारचा गुप्त किंवा उघड संकोच प्रतीत होत नव्हता. केवळ मिनिटांच्या परिचयांतच तिनें माझ्याशीं बोलण्यांत इतकी मोकळीक कशी घेतली ह्याचें मला राहून राहून आश्चर्य वाटत होतें. एकाद्या यक्षिणीबरोबर तर मी बोलत नाहीं ना, असाहि संशय मनांत डोकावल्याविना राहिला नाहीं. तिच्या चर्येवर किंवा तिच्या बोलण्यांत परिहास्ययुक्ततेचा लवलेशहि दिसत नव्हता. 'आमचा महिलासमाज अत्यंत जागृत झाला आहे व राजकीय आंदोलनांत तो पुढें येत आहे, ह्या सर्व गोष्टी मी जशा वाचल्या होत्या, तशाच ऐकल्याहि होत्या. परंतु अशा तऱ्हेची स्त्री पाहण्याची मात्र माझी ही पहिलीच वेळ होती. मला वर्तमानपत्रांतून वाचलेल्या क्रांतिकारक दरवडेखोर स्त्रियांची एकाएकीं आठवण झाली आणि मीही कांहींसा भीत भीत म्हणालों, 'आपण......आपण...काय म्हणत आहांत?...माझ्या कांहींच लक्षांत येत नाहीं!'

'हाः हाः हाः' करीत ती एकाद्या रहस्यमय पुरुषाप्रमाणें जोरानें हंसली. येथून हळूच सटकावें व पोलिसला ह्यासंबंधी कळवावें असेंहि मनांत आलें. परंतु त्या दोघांपैकीं एकाजवळ तरी पिस्तूल असावें असा मला संशय आला व त्यामुळें पळून जाण्याचा धीर होईना. परंतु माझी भीति दूर होण्यास फारसा वेळ लागला नाहीं. माझ्या पाठीवर स्नेहभावानें थाप मारीत मीनाक्षी म्हणाली, 'मिस्टर कुमार, तुम्हीं फारच सरळ स्वभावाचे दिसतां. वास्तविक पहातां तुम्हीं एक फिलॉसफर आहांत ! इतक्या थोडक्यांत तुम्हीं घाबरलांत कसे ?'

'नाहीं–मी घाबरलों नाहीं. पण तुमच्या गोष्टी ऐकून मला आश्चर्य मात्र वाटलें आणि अजूनहि वाटत आहे !'

'तुमचीं मुलं बाळं इथंच आहेत ?'

'होय !'

'मग आमच्याबरोबर चला. तुम्हांला घरीं जाण्याची घाई तर नाहीं ना ?'

'नाहीं. कांही घाई नाहीं. चला.'

रस्त्यानें खूप गप्पागोष्टी करीत आम्हीं तिघें त्यांच्या मुक्कामावर येऊन पोचलो.

त्यांची रहावयाची खोली लहानशीच असली, तरी स्वच्छ व नीटनेटकी होती. आम्हीं येण्यापूर्वीच नोकरानें टेबलावर दिवा उजळून ठेविला होता. मीनाक्षी एका खुर्चीवर बसली आणि टेबलावर पडलेला पंखा हातांत घेऊन वारा घेऊं लागली. तिच्या पातळाचा डोक्यावरू घेतलेला पदर खालीं सरकला होता. मी तिच्या चेहऱ्याकडे टक लावून पहात होतों. ती दिसण्यांत सुंदर नसली तरी तिच्या चेहऱ्यावर एक प्रकारचें रहस्यपूर्ण आकर्षण विराजत असल्याचें मी पूर्वी सांगितलेच आहे. घरीं येतांच ती कांहीशी अन्यमनस्क झालेली होती. आम्ही तिघेहि स्तब्ध बसलों होतों. मीनाक्षीच्या चेहऱ्यावर केवळ मिनिट–अर्ध मिनिटपर्यंत वेदनायुक्त छाया दृग्गोचर होई; तर लगेच दुसऱ्या क्षणीं तेथें कठोरतेची भावना विसजूं लागे !

शांतताभंग करण्याच्या हेतूनें व कांहींसा विनोद निर्माण करण्यासाठीं ती मिस्कीलपणानें हंसत मला म्हणाली, 'असें टक लावून माझ्याकडे काय पहातां ? अशा रीतीनें एकाद्या स्त्रीकडे पाहणें हें शिष्टाचारला सोडून आहे हें आपल्याला ठाऊक नाहीं कां ?'

मी गायब्रून म्हणालों 'छे—छे...माझा तसा हेतु नव्हता.

'मिस्टर कुमार, किती भोळे आहांत तुम्हीं !' असें म्हणून ती जोरानें हंसूं लागली; परंतु मला माझीच कोण लाज वाटली म्हणून सांगू ! परंतु मी माझी बाजू सावरून धरण्याच्या हेतूनें म्हणालों, 'मीनाक्षीबाई, मला माफ करा; परंतु एक गोष्ट मला तुम्हांला सांगावीशी वाटते. तुम्हीं साधारण स्वरूपाच्या बाई नाहींत एवढेंच मला सांगावयाचें आहे"

'साधारण स्त्री नाहीं ?—म्हणजे ह्याचा अर्थ काय ?' तिनें आश्चर्यानें विचारलें.

मी उठून उभा रहात म्हणालों, 'हे बघा. मला आतां घरीं गेलंच पाहिजे. बराच वेळ झाला आहे. परंतु आजची ही सायंकाळ मला जन्मभर आठवेल; आणि तुम्हांला तर मी कधींच विसरूं शकणार नाहीं !'

'अहो, बसा कीं—असं काय करतां ?—इतक्या लवकर कुठं चाललां ?' असें म्हणून ती माझा हात धरूं लागली. तिच्या बोलण्यांत आणि ओठावर अद्या-पहि तीच मिस्किलपणाची लकब विराजत होती. मी म्हणालों, 'नाहीं-आतां मला येथें थांबणें शक्य नाहीं.'

ती एकदम उठून उभी राहिली आणि माझे दोन्ही हात आपल्या हातांत घेत म्हणाली, 'तुम्ही म्हणाला होता ना कीं, तुमची मुलंबाळं आहेत म्हणून ?'

'होय—आणि खरं आहे तें !'

'मला त्यांना पाहण्याची फार फार इच्छा आहे ! आणाल का त्यांना इथं एकाद् दिवशी ?'

मी आश्चर्यानें विचारलें, 'मुलाबाळांना ?—आणि इथें ?'

'होय इथंच!-तुह्मांला आश्चर्य काय ह्मणून वाटतं? माझी तुम्हांला हात जोडून विनंती आहे—आणाल कां त्यांना इथं एकदां?

तिच्या ह्या शद्बांत असीम वेदना सामावलेली होती. मी माझे हात तिच्या हातांतून सोडवीत ह्मणालों, 'ठीक आहे-शक्य झाल्यास आणीन!'

—आणि मी तेथून एकदांचा बाहेर पडलों!

घरचा रस्ता चालत असत, पुन्हां कधींहि त्या जागीं न जाण्याचा मी मनाशीं निश्चय करीत होतों. परंतु दुसरे दिवशीं सायंकाळ होतांच, कोणत्या तरी अज्ञात आर्जवाच्यायोगें माझें मन मीनाक्षीकडे धांव घेऊं लागलें. मी त्या दिवशीं पुन्हां तिच्याकडे गेलों; आणि त्यानंतर वरचेवर जाऊं येऊं लागलों!

प्रत्येक वेळीं ती माझ्या पत्नीला व मुलाला आणण्याबद्दल विनवीत असे. एके दिवशीं कल्याणी व किशोर यांना घेऊन मी तिच्याकडे गेलों. कल्याणीला पहातांक्षणीच ती तिला कडकडून भेटली. त्यानंतर किशोरला उचलून त्याचे तिनें पटापट कितीतरी मुके घेतले. कितीतरी वेळपर्यंत ती त्याच्या चेहऱ्याकडे टक लावून पहात होती. जणूं काय उभ्या आयुष्यांत तिने कधी लहान मूल पाहिलें नव्हतें! स्नेहाश्रूंनी तिचे डोळे डबडबले होते हें सर्व पाहून कल्याणी तर घाबरूनच गेली. कांहीं वेळानंतर मीनाक्षी ह्मणाली, 'बहेन, मला वेडी ह्मणत असाल तुह्मी—होय ना? पण खरं सांगतें, इतकें सुंदर मूल मी पूर्वी कधींच पाहिलं नव्हतं!'

असें ह्मणून तिनें किशोरचा पुन्हां मुका घेतला-पण तो भीतीमुळें रडूं लागला.

त्या दिवशीं मीनाक्षी व कल्याणी बराच वेळपर्यंत गोष्टी सांगत होत्या. मी किशोरला घेऊन दुसऱ्या खोलींत जाऊन बसलों होतों. आह्मीं घरीं परत आल्या-नंतर, मीनाक्षीनें अद्याप लग्न कसें केलें नाहीं, आणि एका परपुरुषाबरोबर ती कशी राहूं शकते ह्या गोष्टीबद्दल कल्याणीनें माझ्याजवळ आश्चर्य प्रकट केलें. पण कांहींही असलें, तरी मीनाक्षीनें तिच्यावर आपली जादू टाकली होती एवढें मात्र खरें!

एके दिवशीं सायंकाळीं मीनाक्षी एकटीच आपल्या खोलींत बचिंत बसलेली होती. उल्हास कुठें तरी बाहेर कामाला गेला होता. तिच्या चर्येवर उदासीनतेची विषण्ण छटा विराजत होती. मी ह्मणालों, 'का ?–आज फारच उदास दिसतां ?'

ती माझ्या अगदीं जवळ येऊन दाबलेल्या स्वरांत परंतु आवेगपूर्वक ह्मणाली, 'मिस्टर कुमार, तुह्मी अद्याप मला ओळखूं शकला नाहीं—आणि ओळखणार नाहीं. मी अत्यंत पापी आणि हत्याकारिणी स्त्री आहे!'

'हत्याकारिणी ?—मीनाक्षीबाई, तुह्मीं काय बोलतां आहांत ? नाहीं–माझा ह्या गोष्टीवर मुळींच विश्वास बसत नाहीं! मी स्वतः डोळ्यानें जरी तुह्मांला कोणाची हत्या करतांना पाहिलें, तरी त्यावर माझा विश्वास बसणार नाहीं!'

'हं: ! तुमचा विश्वास नाहीं. ठीक आहे! पण मी तुम्हांला विचारतें, तुमचा पुनर्जन्मावर विश्वास आहे का ?' ती कांहींसें उदास हास्य करीत ह्मणाली.

त्यावर मी ह्मणालों, 'अवश्य! मनुष्याच्या ज्या अतृप्त आकांक्षा ह्या जन्मीं पूर्ण होऊं शकत नाहींत, त्यांचा ह्या जन्मीं पूर्ण विनाश होईल ही गोष्ट मी मानीत नाहीं. जो मरेल तो पुन्हां जन्म घेईलच असा मला विश्वास वाटतो!'

अत्यंत उत्सुक परंतु व्याकुळ दृष्टीनें माझ्याकडे पहात ती बोलूं लागली, 'हें बघा, मी कृतीनें नास्तिक आहे. आमच्या गटांतील कोणतीच व्यक्ति ईश्वरावर विश्वास ठेवीत नाहीं. परंतु माझ्यांत मात्र स्थित्यंतर होतांना दिसत आहे. गेले कांहीं दिवस ईश्वरावर विश्वास बसावा ह्मणून मी अधिकाधिक व्याकुळ होत आहे! परंतु प्रयत्न करूनहि माझा विश्वास बसूं शकत नाहीं. एखाद्या वेळीं एखादा क्षण असा येतो कीं, ज्या वेळीं माझा आत्मा कोणत्या तरी अज्ञात रहस्यमय भावनेनें अगदीं कालवून जातो! माझ्या मरणोत्तर मी पुन्हां जन्म घेणार ही भावना माझ्या हृदयांत अधिकाधिक दृढ होत असल्याचें मी पहातें आहे—आणि यदाकदाचित् ही गोष्ट खरी ठरली, तर ह्या आयुष्यांत मी ज्या अगणित चुका केलेल्या आहेत, त्या सर्व पुनर्जन्मोत्तर नवीन आयुष्यांत मी दुरुस्त करीन व नवीन उदास जीवन

व्यतीत करीन! तुमच्या पत्नीचें–कल्याणीचें–जीवन धन्य आहे! तिनें आपल्या आयुष्याचें खरें सार्थक केलें आहे!'

मीनाक्षी ह्या वेळीं अशा कांहीं आवेगाने बोलत होती कीं, तो आवेग पाहून मी स्तंभित झाल्याविना राहिलों नाही! ही असें कां बोलते तेंच माझ्या लक्षांत येईना. ती पुढें बोलूं लागली–' प्रमाद! प्रमाद! माझें सारें जीवन प्रमादपूर्ण आहे! जीवनाच्या अफाट प्रदेशांत चुकलेल्या वासराप्रमाणें माझी स्थिति झालेली आहे! सी. आय. डी. वाल्या लोकांचा ससेमिरा रात्रंदिवस माझ्या पाठीशी लागलेला असतो. लवकरच मी पकडलीहि जाईन. तुम्ही विचाराल कीं माझा अपराध कोणता?—माझा अपराध दुसरा कोणता असणार?—हत्या! हत्या! एका वृद्ध सावकाराच्या घरावर पांच महिन्यांपूर्वी आम्ही दरवडा घातला व त्यांत तो सावकार मारला गेला. त्या गोष्टीला पांच महिने होऊन चुकले. मन हलकं करावसं वाटलं म्हणूनच हें सर्व तुम्हांला सांगून टाकलं. पण नाही......माझ्या आयुष्यांतील एक भयंकर घटना मला अद्याप तुम्हांला सांगावयाची आहे. माझ्या आयुष्यांत माझ्या हातून जी अनुचित कृत्यें घडली, त्या सर्वांत ती घटना विशेष महत्त्वाची आहे. तो दिवस! तो दिवस मला आजहि नीट आठवतो. क्रांतिकारकांच्या गटांत शिरल्या-नंतरची गोष्ट. मी आणि उल्हास आजच्यासारखेंच त्यावेळीहि एकत्र रहात असूं. आमचे एकमेकांवर प्रेम होते आणि आहे हें सांगावयास हवें असें नाही. मी वावरत असलेल्या विशिष्ट समाजाच्या नीतितत्त्वांचा माझ्यावर पगडा बसलेला होता. मी पूर्णपणें नवमतवादी बनले होते. उल्हासमध्यें आणि माझ्यामध्यें विवाहाचा पडदा आड यावा असें मला किंवा उल्हासला कधींच वाटलें नाही. मातृपदावर विराजमान होण्यासाठीं माझें हृदय आजच्यासारखेंच त्यावेळीहि आसुसत होतें. कित्येकदां मी ती गोष्ट उल्हासला स्पष्टपणें बोलून दाखविली. परंतु उल्हासानें मात्र, तेवढ्या एकाच गोष्टीला आळा घालण्याची मला ताकीद दिली. मनुष्यमात्रांत असलेल्या नैसर्गिक पिपासांची पूर्ति आम्ही करीतच होतों—पण ती उघडपणें नव्हे! माझ्या भावी आयुष्यांत त्यामुळें निराशेचा काळाशार अंधार पसरणार आहे ह्याची जर मला जाणीव असती, तर त्या बाबतींत मी इतकी उतावीळ झालें नसतें. पण चुकीचा परिणाम अमुक एका स्वरूपाचा होणार आहे हें जर माणसाला

पूर्वीच कळतें, तर जगांत कोणीच कधीं कसल्याहि प्रकारचीं चूक केली नसती. आणि अखेरसि !—अखेरीस जें व्हायचें तेंच झालें. कोंबडें झांकून ठेविलें, तरी तांबडें फुटायचें रहात नाहीं हेंच खरें ठरलें ! निसर्गाशीं प्रतारणा करून माझें भागलें नाहीं. जी गोष्ट लपवून ठेवण्याचा प्रयत्न केला ती अखेरसि बाहेर आलीच. त्या-दिवशीं मी एका गोजिरवाण्या मुलाची माता झाल्याचें मला दिसून आलें. उल्हास आपल्या लांबच्या फिरतीवरून परत आला होता. होत असलेल्या घडामोडींची मी त्याला कधींच दाद लागूं दिली नव्हती. घराच्या दारांत पाऊल ठेवतांच त्याला सर्व प्रकार कळला–आणि नंतर काय ? त्यानें मला खूप मोठें व्याख्यान ऐकविलें. मी सर्व कांहीं ऐकून घेतलें. कुमारी माता समाजांत राहूं शकत नाहीं, हें उल्हासनें मला पटवून दिलें. संकटग्रस्त झालेली व्यक्ति अधिक हळुवार व भावनाशील होते. माझीहि त्या वेळीं तीच स्थिति झाली. मी कुमारी माता होतें ! कौमार्यावस्थेंत प्राप्त झालेल्या मातृत्वाला समाजांत जागा नसते ! झालें ! उल्हासनें मला उपाय सुच-विला आणि तो मला पटला. माझ्या गोजिरवाण्या बाळाची हत्या करून माझें कौमार्य शाबूत ठेवण्याचा तो उपाय होता ! कोण भयंकर गोष्ट होती ती ! —पण ती त्या वेळच्या माझ्या हळुवार...अजाण मनाला तात्काळ पटली. प्रसूतीनंतरच्या वेदना शमतात न शमतात तोंच माझ्या गोजिरवाण्या बाळाच्या नरड्याला नख लागलें ! त्यानंतरची सर्व व्यवस्था उल्हासनें लाविली. आज मी उजळ माथ्यानें समाजांत वावरतें...पण...पण, हें सर्व करून अखेरीस माझा कोणता लाभ झाला ? स्वतःच्या स्त्री–हृदयाचा सर्व ओलावा सुकून गेल्या-नंतर आतां कुठें माझे डोळे उघडले आहेत ! पण आतां चेव येऊन काय उपयोग ! जीवनाच्या वास्तविक आनंदाशीं आतां माझा परिचय होऊं पहात आहे. तुमच्या पत्नीला आणि मुलाला पाहिल्यापासून माझी जीवनधारा बदलली आहे. पण आतां काय उपयोग ? तुमचा मुलगा किशोर ! किती गोड आहे तो ! तुम्ही आणाल का त्याला इथं एकदां ? पण नकोच—कधींच नका आणूं त्याला पुन्हां इथं ! ह्यापुढें तुम्हीं सुद्धां इथं येणं धोक्याचं आहे. ज्या गुप्त हेराचे मला भय वाटत होतें तो इथेंही येऊन पोंचला आहे. परंतु तुमची व माझी भेट पुन्हा कधीं होईल ? कल्याणी-बाई आणि किशोर ह्यांना कशी भेटूं ? हाय...'

इतकें बोलून ती ओक्साबोक्शी रडूं लागली. तिनें माझे हात घट्ट धरले. मी तिला उठवीत म्हटलें, 'मीनाक्षी...मीनाक्षी...'

मीनाक्षी उठून उभी राहिली. तिच्या अश्रु-सिक्त डोळ्यांत एकप्रकारचें विश्रब्द हास्य प्रतीत होत होतें. ती म्हणाली, 'मी पकडली जाणार असल्यामुळें घाबरलें असें वाटून मी रडतें आहे असं समजूं नका! संशय आणि भ्रम ह्या दोहोंतच माझा जन्म खर्च झाला! परंतु आतां मी प्रसन्नचित्त आहे! माझ्या शिरावर हात ठेवून फक्त इतकाच आशीर्वाद द्या कीं, पुनर्जन्मांत तरी माझें स्त्री-जीवन सार्थ होवो! स्त्री ही सामर्थ्यवान् आहे ह्याबद्दल वाद नाहीं. पुरुषाप्रमाणेंच शारीरिक, बौद्धिक, त्याचप्रमाणें सामाजिक, राजकीय क्षेत्रांत बरोबरीच्या नात्याने कार्य करण्याची तिची पूर्ण लायकी आहे. संकटींच्या प्रचंड पर्वतांनाहि वेळप्रसंगीं ती चुरडून टाकूं शकते. परंतु त्यामुळें तिचें जीवन सार्थकी लागतेंच असें नाहीं. स्त्री-जीवनाची परिसमाप्ति तिच्या अनंतकालच्या मातृत्वपदांत आहे; आणि त्या पदापासून मी पूर्णपणें ढळलें आहे! माझें असमाधान त्या एकाच गोष्टींत सामावलेलें आहे. स्त्रीनें आपलें साम्राज्य प्रस्थापित केले, तरी तिला तिच्या मातृपदाची ओढ लागल्याविना राहणार नाहीं. तेंच तिचे सिंहासन आहे आणि तें सिंहासन प्राप्त केल्याविना तिच्या मानसिक साम्राज्यांत शांतता आणि समाधान नांदणें शक्य नाहीं! मिस्टर कुमार, तें समाधान लाभणें मला माझ्या ह्या आयुष्यांत तरी शक्य नाहीं. म्हणूनच म्हणतें, पुनर्जन्मांत तें समाधान मिळो असा आशीर्वाद मला द्या!'

अत्यंत व्यथित हृदयानें मी तिच्या शिरावर हात ठेवला. त्यानंतर ती एकाएकीं दचकल्यासारखी झाली आणि मला दाराकडे ढकलीत नेत म्हणाली 'जा—कृपा करून जा! ह्या जागीं तुम्हीं आतां एक क्षणभरहि राहणें योग्य ठरणार नाहीं. धोका आहे...जा लवकर!'

——मी कांहीसा घाबरतच बाहेर पडलों.

दुःखाने म्हणा किंवा भीतीनें म्हणा, त्या दिवसानंतर मी कधींच तिच्याकडे गेलो नाही. कांहीं असो. ह्या घटनेनंतर एका आठवड्याच्या आंतच वृत्तपत्रांतून

एक वृत्त झळकलें. उल्हास आणि मिनाक्षी यांना अटक करण्यांत आली होतीं. दरवडा घालून खून करण्याचा त्यांच्यावर आरोप होता.



## सारजा मावशी— ........................................६

शुक्रवार पेठेंतील नर्मदा सोप फॅक्टरीवरून जाणारा सरळ रस्ता काशीबाईच्या घाटाजवळ संपतो. तेथें एक दगडी पूल आहे आणि तो पूल ओलांडला कीं, डावी-कडचा सरळ रस्ता सकरदऱ्याला जातो आणि उजवीकडचा रस्ता ख्रिस्ती लोकांच्या जुन्या गिरिजाघरावरून राजाबाक्षाच्या मारुतीकडे जातो. नागपूर ही भोसल्यांची राजधानी झाली तेव्हांपासून काशीबाईचा घाट ही जागा भोसले घराण्यांतील लोकांची दहनभूमि झाली. पूर्वीचे नागपूर आणि आजचें नागपूर ह्यांत जमीन–अस्मानचा बदल झाला आहे. घाटाजवळील दगडी पुलापलीकडे कांहीं वर्षांपूर्वी आजच्यासारखी वस्ती झालेली नव्हती. तसेंच पुलासमोरून गणेशपेठेकडे जाणारा रस्ता नि त्या रस्त्यावरील मॉडेल मिल्सच्या इमारती व पारशी लोकांचे बंगलेसुद्धां दहा–पंधरा वर्षांपूर्वी दिसत नव्हते. दगडी पुलाशेजारी आणि पलीकडे त्या वेळीं गोरगरीबांची वस्ती होती. पुलाशेजारीच कापसाचें एक जिन होतें आणि त्या जिनांत काम करणारे बरेचसे स्त्री–पुरुष मजूर त्या वस्तींत रहात असत. आज त्या ठिकाणीं मोठी वस्ती झाली असली, बंगले दिसत असले आणि श्रीमंतांच्या मोटारी दिसत असल्या, तरी जुन्या काळची-जुन्या वस्तीची आठवण करून देणारी झोंपडीवजा विटा-मातीचीं बसकीं घरेंहि दृष्टीस पडतात. पुलापलीकडील राजाबक्षाकडे वळणाऱ्या रस्त्यावरील अशाच एका झोपडीवजा घरांत राहणाऱ्या एका म्हातारीची ही कहाणी आहे—

त्या म्हातारीचें नांव सारजाबाई. आम्ही तिला 'मावशी' म्हणत असूं. ती साऱ्या वस्तीचीच 'मावशी' होती म्हणाना! सारजा मावशींचें सारें आयुष्य दगडी पुलापलीकडच्या त्या वस्तींतल्या एका छोट्याशा घरांत व्यतीत झालें आणि गेल्या वर्षांच–वयाच्या सत्तराव्या वर्षी–ती तेथेंच वारली. ती आजन्म अविवाहित होती हें आम्हांला आतां आतां कळलें. तोंपर्यंत ती एक म्हातारी विधवा आहे अशीच आमची समजूत होती. कापसाच्या जिना शेजारींच तिचें तें घर होतें. दररोज पहाटें साडे–पांचचे सुमारास जिनाचा भोंगा वाजावयाचा. वस्तींतले मजूर जागे व्हावयाचे. दुसरा भोंगा सहा वाजतांचा. त्या वेळीं मजुरांना जिनांत कामावर हजर रहावें लागे. सारजा मावशीच्या आयुष्यांतील बराचसा काळ त्या जिनांत मजुरी करण्यांत गेला. पहिला भोंगा झाला कीं, मजुरांची वर्दळ सुरू होई आणि दुसरा भोंगा झाला कीं, जिनांतील यंत्राची घर घर ऐकूं येई. मी बराच लहान होतों त्या वेळीं. आम्ही मावशीच्या शेजारींच रहात असूं. मावशीचें घर आणि आमचें घर म्हणजे जवळ जवळ एकच–अंगणाचेंच काय तें अंतर. यदाकदाचित् आम्ही जागे असलों, तरच जिनाचा भोंगा आम्हांला ऐकूं येई. पण सारजा मावशी म्हणायची कीं, झोंपेंतसुद्धां कित्येकदां तिला भोंगा ऐकत असल्याचा भास होतो.

—आणि तिला असा भास व्हावा ह्याला कारणहि होतें. वयाच्या अकराव्या वर्षी ती नागपुरांत आली आणि जिनांत नोकरीस राहिली. तेव्हांपासून अखंड चाळीस वर्षे तिनें त्या जिनांत काम केलें. त्या वेळो कामाचा फार ताण असे. पहाटें सहा वाजतां कामास सुरवात होई तें सायंकाळीं सहा वाजतां काम संपे. ह्या अवधींत मावशी सारखी कामांत गुंतलेली असावयाची. तिचें काम तिला दिवसभर पुरून उरे. आठवड्यांत एक रविवारचा दिवस अपवादादाखल वगळल्यास, वर्षांतून सहा महिने कांहीं सारजा मावशीने बाहेरचा सूर्यप्रकाश पाहिला नाहीं. जिनाच्या खिडक्यांतून जो सूर्यप्रकाश येईल तेवढाच!

अशा वातावरणांत वावरणारी दुसरी जर कोणती व्यक्ति असती, तर शारीरिकदृष्ट्या किंवा मानसिकदृष्ट्या तिचा केव्हांच फडशा उडाला असता. परंतु ती

सारजा मावशी होती म्हणूनच तिच्यावर ह्या वातावरणाचा तिळमात्र परिणाम झाला नसावा. तिला मिळणारे वेतन तसें जमतेमच होतें. नाही म्हणावयास तिचा खर्च वजा जातां थोडी शिल्लक रहात असे. मावशीला नातलगमाणसें कोणीं नव्हतीच. माझ्यासारखीच अशी थोडीफार माणसें हीच तिची नातलगमंडळी. त्यांच्या आदरातिथ्यांत मावशीनें कधी रतिभर कसूर केला नाही. तिच्या घरांत क्वचितच दिवा उजळलेला दिसावयाचा. सायंकाळ संपून अगदी अंधार पडला कीं, मावशीच्या घरांतली चूल पेटायची. एकटीचें जेवण. तें एकदां आटोपलें कीं दिवस-भरांतला सर्व कार्यक्रम संपे. शेजारीं एक छोटेसे रामाचें देऊळ होते. घरांच्या खिडकींतूनच मावशी दररोज सकाळ–सायंकाळ रामाचें दर्शन घेई. आयुष्याच्या अगदीं शेवटच्या दिवसापर्यंत तिला वैद्याची गरज पडली नाही कीं वकीलाच्या कचेरीत धांव घ्यावी लागली नाही. सारजा मावशीचें आयुष्य असें साधें आणि सरळ होतें.

मावशीच्या दोन म्हाताऱ्या मैत्रिणी होत्या. मावशी आम्हांला खूप आव-डावयाची; पण त्या मैत्रिणी मात्र आम्हांला आवडत नसत. त्या वेळीं आम्ही फारच लहान होतो. त्या दोघी मैत्रिणी आम्हांला न आवडण्याचें मुख्य कारण म्हणजे, त्यांना आमचा हेवा वाटे आणि आम्हांला त्यांचा हेवा वाटे. हें त्या वेळीं कळत नव्हतें–पण आज उमजतें. त्या दोघींपैकीं एकीचें नांव शारदा आणि दुसरीचें नांव गिरिजा. दोघींच्या चेहऱ्यावर खूपच सुरकुत्या होत्या. मावशीचा चेहरासुद्धां सुरकतलेला नव्हता असें नाहीं. पण त्या सुरकुत्या आम्हांला मात्र कधींच दिसल्या नाहींत. शारदा ही मावशीसारखीच कुमारी–वृद्धा होती म्हणे. गिरिजा मात्र विधवा होती. त्या दोघी आमच्यावर नेहमीच टीका करीत आणि 'सारजा मावशीच्या लाडानें वस्तींतली ही पोर टारगट झाली आहेत' असें म्हणत. पण त्या बोलण्याला आम्ही हंसत असूं आणि त्यांची टिंगल करीत असूं–कारण त्यापैकीं एक शारदा, कानानें बहिरी होती; आणि दुसरी गिरजा, तिच्या ओंठांवर बारीक बारीक मिशा होत्या. मावशी आमच्यावर रागवावयाची. पण तें रागावणें वरपांगी आहे हें आम्हांला ठाऊक होतें–अशा वेळीं ती रागावली की, दुसऱ्याच क्षणीं हंसतहि असे.

त्याच वस्तींत आणखी एक म्हातारा इसम रहात असे. मावशीच्या अखेरच्या अंत्यविधीच्या वेळीं त्यानें मला सांगितलें होतें कीं, सारजा, शारदा नि गिरजा ह्या तिघांनाहि तो त्या अगदी लहान होत्या तेव्हांपासून ओळखतो. त्या तिघींची नि त्याची पहिली गांठ पडली, ती कांहीशा विचित्र घटनेमुळेंच—आणि त्य कारणाने ती घटना तो आजहि विसरला नव्हता……

तो एक जुना खाडू वैद्य होता. दगडीपुलापलीकडील वस्तींत तो रहात असे. त्याला त्याच्या वैद्यकीमुळें—आंधळ्या गांवांत काणा राजा असावा त्याप्रमाणें—विशेष मान असे आणि वस्तींतल्या शिष्टांत त्याची गणना होई. एकें दिवशीं, एका रोग्याला तपासण्यासाठीं म्हणून वैद्यराज मोठ्या लगबगीने पहाटेंच घराबाहेर पडले. शेतांतून जवळचा रस्ता होता. समोरून तीन मुली एकमेकांच्या हातांत हात घालून धांवत येत होत्या. रस्ता आडवीत त्या सरळ धांवत आल्या आणि जणूं काय, समोरून कोणी येत आहे ह्याची तिळमात्र क्षिति न बाळगतां वैद्यराजाला जोराचा धक्का देऊन पुढें निघाल्या. वैद्यराज आश्चर्यानें थक्क झाले. मुलींनी लगेच क्षमा मागितली आणि त्यानंतर वैद्यराजांना कळून आलें कीं, मधली मुलगी पूर्णपणें जागी असून, तिच्या बाजूच्या दोन मुली अर्धवट झोंपेंत आहेत. पहाटे उठून त्या तिघींना जिनांत कामावर जावें लागत असे; आणि अर्धवट झोंपेंत असलेल्या त्या दोघींना जिनांत घेऊन जाण्याचा मधल्या मुलीचा नित्यक्रम असे. परंतु हा प्रसंग घडला त्या दिवशीं मधली मुलगी सुद्धां थोडीशी झोपेंतच होती—आणि ती मुलगी म्हणजे आमची सारजा मावशी ! सारजा मावशी एकें काळीं दिसायला बरीच सुंदर होती म्हणतात. पण तें आम्हांला कधीं खरें वाटलें नाहीं—तसेंच ती एकें काळीं मुलगी होती ह्यावरहि आमचा विश्वास बसला नाहीं. खरें वाटण्याची किंवा विश्वासाची आम्हाला फारशी दरकार वाटली नाहीं; कारण ती आमची सारजा मावशी आहे ह्या व्यतिरिक्त फारसें जाणून घेण्याच्या आम्ही कधीं भानगडींतच पडलों नाहीं !

—सारजा मावशी आमची होती—आणि स्वतःच्या चार खोल्यांच्या घरांत ती पूर्णपणें सुखी होती.

—अशा रीतीनें अनेक वर्षें निघून गेलीं. मावशीच्या दिनचर्येंत कधीं फरक पडला नाहीं—पण काळाच्या ओघांत मावशी म्हातारी मात्र झाली होती !

—आणि एकें दिवशीं नेहमीप्रमाणें पहाटे जिनांचा भोंगा वाजला. पण तो मावशीला बोलविण्यासाठीं नव्हे. मावशी ह्यापुढें जिनांत जाणार नव्हती. ती म्हातारी झाली होती. विश्रांति घेत ती ह्यापुढें आपलें उर्वरित आयुष्य त्या घरांत व्यतीत करणार होती.

—सारजा मावशीच्या उत्तर–आयुष्यास आतां सुरुवात झाली.

आणि नंतर विलायतेंत का कुठेंसें कांहींतरी झालें आणि आर्थिक बाजार एकाएकी मंदावले. जगांत हलकल्लोळ उडाला आणि त्या मंदीच्या भोंवऱ्यांत निर्माण होणाऱ्या वलयांत श्रीमंतांपासून तों गरीबांपर्यंत सर्वच सांपडले. पुलापलीकडील मावशीच्या कापसाच्या जिनालासुद्धां ह्या परिस्थितीची झळ लागण्यास फारसा वेळ लागला नाहीं.

मावशीच्या पगारांतून दर महिन्यामागें थोडीशी रक्कम जिनाच्या प्रॉव्हिडन्ट फंडात जमा होई. एक महिन्याचा तिचा पगारहि शिल्लक राहिला होता. परंतु मंदीच्या ह्या वावटळींत बिचारी मावशी ह्या पैशा–अडक्याला मुकली ! हें असें का झालें, तें तिला शेवटपर्यंत समजूं शकलें नाही स्वतःचा चारितार्थ कसा चालवावा ह्याची तिला पंचाईत पडली. कांहींतरी केलेंच पाहिजे. पण ती म्हातारी झाली होती. काम करण्याची शक्ति नव्हती. मग करायचें काय ?–तिनें उपाय शोधून काढला. घरांतील कांहि खोल्या भाड्यानें देण्याचे तिनें ठरविलें.

मावशीच्या घरांत राहणाऱ्या आणि कांहीं दिवस राहून तें घर सोडून जाणाऱ्या भाडेकरूंची मी जंत्री करूं लागलो कीं, आपण इतिहासाचीं पृष्ठें तर वाचीत नाहीं ना, असा भास होतो. भोंसलें घराणें नागपुरांत केव्हां आलें... पहिला रघूजी भोंसले गादीवर केव्हां बसला...आणि नंतर......?–असेंच कांहींसें त्या भाडेकरूंचीं जंत्री घेतांना होई. त्यांच्यापैकीं कांहीं लोक डोळ्यांसमोर दिसत आणि नाहींसे होत. मला आजहि थोडे थोडे आठवतें–तो तुकाराम नांवाचा इसम. त्याची शरीरयष्टि किरकोळ होती आणि त्याच्या गंभीर चेहेऱ्यावर मी तरी कधीं हास्यरेषा चमकलेली पाहिली नाहीं. त्याला चहा पिण्याचा भारी सोस–पण बिन. साखरेचाच चहा घ्यायचा. आणि तो दुसरा भाडेकरी–जगन्नाथ!–तो तरुण

होता तसाच नेहमीं हंसतमुख दिसे. त्याच्या तोंडांतल्या वरच्या कवळींतला एक मधला दांत तुटला होता. महालांत नव्यानेंच सुरू झालेल्या एका सिनेमा थिएटर-मध्यें तो 'डोअरकीपर' च्या नोकरीवर होता आणि अधूनमधून तो अम्हांला फुकट सिनेमा दाखवित असे.

त्या वेळचे सिनेमा बोलके नव्हते. 'लाल भुजक्कड' किंवा 'एडीपोलो' सारखे सिनेमा दाखविले जात. तिकिटाचे दरहि आजच्यासारखे नव्हते. 'चलो चलो!—लालभुजक्कड देखो...तिकिटके दाम तीन आने—दो आने—एक आना!—बच्चो के लिये आधा रेट!' असें मोठमोठ्यानें ओरडत असतांना मीं जगन्नाथला कित्येकदां पाहिलें होतें. सिनेमाच्या फाटकासमोर उभें राहून जगन्नाथ असा ओरडूं लागला की, आम्हांला त्याच्यासंबंधी आदर वाटूं लाग आणि लांब उभें राहून आपल्या सोबत्यांना आम्ही अंगुलीनिर्देशाने जगन्नाथची ओळख करून देत असूं. जगन्नाथाची व आपली ओळख आहे ह्याबद्दल आम्हांला कोण अभिमान वाटावयाचा! कधीमधीं आम्ही अर्ध्या आण्याचें (शेवटच्या दरांतील 'आधा रेट') तिकिट काढून सिनेमाला गेलो, तरी जगन्नाथ आम्हांला वरच्या वर्गांत नेऊन बसवी. तेव्हांपासून जगन्नाथ हा इसम फार मोठा माणूस आहे अशी आमची खात्री झाली होती.

आणि जगन्नाथ मावशीचें घर सोडून गेल्यानंतर तिसरा भाडेकरी तेथें आला. त्याचें नांव परशराम. तो मोठा तऱ्हेवाईक नि विचित्र होता. मावशीच्या घरांत पाऊल ठेवल्यापासून, त्यानें स्वतःसंबंधीच्या नाना शंका-कुशंकांसाठीं इतरांच्या मनांत जागा करून दिली. मावशीलासुद्धां तो फारसा आवडत नसावा. सक्करदऱ्याच्या रस्त्यावरील एका देशी दारूच्या दुकानांत तो नोकर होता. रात्रीं-बेरात्रीं तो खूप दारू पिऊन परत येई आणि बेहोष होऊन पडून राही. आम्हां सर्वांनाच त्याची भीति वाटे. मावशीसुद्धां त्याला भीत असे. पण तिनें तसें कधीं दर्शविलें नाहीं. परशरामला आणखी एक नाद होता. घड्याळ दुरुस्त करीत बसण्याची त्याला भारी खोड. एक जुनें पुराणें शाबूत घड्याळ त्याच्या-जवळ होते आणि कांहीं घड्याळांचे सांगाडे त्याने जपून ठेवले होते. रात्रीची

दारूची निशा उतरल्यानंतर राजश्रीचें घड्याळाचे दुरुस्तीकाम सुरू होई आणि त्यांत तो इतका तल्लीन होऊन जात असे कीं, त्याला खाण्यापिण्याचीहि शुद्ध रहात नसे. परशरामचें शाबूत घड्याळ दररोज दुरुस्त केलें जाई. वर्षानुवर्षे हा क्रम चालला असावा. पण घड्याळाकडे केव्हांहि पाहिलें कीं, तें कधीं खूप पुढें गेलेलें असावयाचें किंवा मागें गेलेलें असावयाचें. दुपारचे तीन वाजले कीं, घड्याळांत रात्रीचें दहा वाजत आणि रात्रीचे दहा वाजतां कधीं पहाटेचे तीन वाजतांना दिसत. असें मजेदार घड्याळ होते तें.

मावशीच्या घरांत एकदां आलेला भाडेकरू सहसा तें घर सोडून जात नसे. भाडेकरी घर सोडून गेलाच, तर त्याला दोन प्रमुख कारणें असत–एक तर त्याला कुठें तरी दुसरी बऱ्यापैकीं नोकरी मिळालेली असे किंवा त्याचे लग्न झालेलें असे. ह्या व्यतिरिक्त भांडूनतंडून कोणी निघून गेला असें मात्र कधीं मावशीच्या घरांतल्या भाडेकरूंबद्दल झालें नाहीं.

पण परशरामने तें घर सोडायला निराळेंच कारण घडलें. दारू खूप पीत असल्यामुळें त्याला हृदयाचा विकार जडला होता. त्यामुळें तो एकें दिवशीं अचानक मरण पावला. मावशी खूप रडली होती–आणि अखेरीस म्हणाली होती कीं, परशराम जवळ दारूचा वास येई.........पण तो कांहीं दारू पीत नसावा......गुत्त्यांत काम करीत असल्यामुळें त्याच्या अंगांतल्या कपड्यांना दारूचा वास येत असावा ! !

आणि त्यानंतर कांहीं दिवसांनीं तेथें हरी नांवाचा इसम रहावयास आला. गणेशपेठेंतील मॉडेल मिलमध्यें तो नोकरीला होता. मॉडेल मिलसला 'पुतळीघर' म्हणत. हरी साधारण मध्यम वयाचा असेल. पुतळीघरांत तो रात्रपाळीच्या कामावर होता. तो सकाळीं घरीं येई आणि दिवसभर झोंपून राही. आम्हीं मावशीकडे गेलो कीं, ती सुरवातीसच आम्हांला तंबी देई आणि म्हणे–' हं–खबरदार !... कुणा गडबड करावयाची नाहीं...उड्या मारायच्या नाहींत...नाहींतर हरीची झोंपमोड होईल ! '–मावशीच्या मनांत हरीविषयीं आदर असावा. कधींकधीं हरीला झोंपेमुळें फुरसत मिळालीच, तर तो आम्हांला पुतळीघरांतल्या खूप गंमती सांगे.

हातमाग विजेच्या शक्तीनें चालतात...विजेचा धक्का बसला म्हणजे काय होते, याचें वर्णन तो करूं लागला कीं आम्हांला हादरल्यासारखे होऊन जाई. आम्हांला हरी खूप आवडला असता–पण त्यासाठीं त्याच्या दुपारच्या झोंपाळूपणांत खंड पडायला पाहिजे होता.

—त्यानंतरच्या सर्व भाडेकरूंची नावें आतां मला आठवत नाहींत. आज विचार करूं लागलो कीं, वाटूं लागतें, मावशीच्या घरांतील सर्व भाडेकरी सुदैवी होते, आणि दुर्दैवीहि होते. सुदैवी होते, कारण ते तेथें आपल्या घरच्यासारखे रहात–मावशी त्यांची बडदास्त ठेवी आणि भाडेंहि कमी आकारी. दुर्दैवीहि होते, कारण तें घर फार लहान होते–तेथें खाजगी स्वातंत्र्य नव्हते आणि वरचेवर आम्हां पोरांसोरांचा त्रास होता. प्रत्येक भाडेकरूंत कांहीं तरी वैशिष्ट्य नि वैचित्र्य होतें—तऱ्हेवाईकपणा होता. परंतु त्या वैचित्र्याची आणि तऱ्हेवाईकपणाची आम्ही शारदा नि गिरिजाप्रमाणें नेहमींच टिंगल करीत असूं. आम्हां मुलांचें खेळणें, बागडणें आणि धिंगाणा घालणें नेहमींच चालूं असे.

रिकामपणाच्या वेळांत मावशीचा एक उद्योग असे आणि तो म्हणजे घरासमोरचा रस्ता साफ करावयाचा. कधीं कधीं दिवसांतून पांच–सहा वेळांसुद्धां ती हा उद्योग करतांना दिसावयाची आणि आम्हांला त्याबद्दल तिचा राग येई. रस्ता साफ करण्याची खोड तिला कां जडली हें एक कोडेंच होते—आणि तें कोडें मला अद्यापहि उलगडूं शकलें नाहीं. कडकडीत हिवाळ्याचे दिवस होते. पहाटे थंडींत उठून मावशी एके दिवशीं अशीच रस्ता साफ करीत होती. थंडीमुळें तिचें सारें शरीर लटलटा कांपत होतें. त्या दिवशीं थंडी लागून ती आजारी पडली आणि नंतर त्यांतून ती पुन्हां बरी झाली नाही. तो हिवाळा संपण्यापूर्वीच तिचा अंत झाला।

—आणि आतां !......

त्या घरासमोरील रस्ता कोणीहि साफ करीत नाहीं. महालांतील सिनेमाचीं तिकिटें आतां अर्ध्या दरांत कोणी देत नाहीं...पहाटे उठून जिन्याकडे जातांना

कोणी दिसत नाहीं !--जग बदललें आहे. आमची सारजा मावशी वारल्यानंतरच तें बदललें. जगांत असा बदल होईल, असें मावशीला तिच्या ह्यातींत कधीं वाटलें सुद्धां नसेल ! आम्हीं सर्वच आज मोठे झालों आहोंत--वयानें आणि बुद्धीनें ! जगाचें बदललेलें स्वरूप आम्हांला दिसतें. पूर्वीचें जग आणि आत्ताचें जग ह्यांत तुलना करतां येते. ओंठाला लाली आणि तोंडाला पावडर लावणाऱ्या मुली किंवा मोटार–सायकलवरून जाणारीं मुलें मावशीच्या काळांत दुर्मिळ होतीं. आम्ही आज त्या गोष्टी प्रत्यक्ष अनुभवीत आहोंत. काळ बदलेल ह्याची मावशीला जाणिव नव्हती असें कसें म्हणावें ?--तिनेंच आम्हांला ओळखलें नाहीं—ती ओळखूं शकली नाहीं—तिला ह्याची जाणीव होती !

—पण आम्हींच तिला ओळखूं शकलों नाहीं—आणि ह्याची आज आम्हांला जाणीव आहे ! हिवाळ्यांत ती जेव्हां आजारी पडली, तेव्हां ती फारच हळवी झाली होती. तिचा माझ्यावर भारी लोभ होता. आजारपणांत मी नेहमीच तिच्याजवळ असे. मृत्यूपूर्वी तिनें आपल्या आयुष्यांतला एक नाजुक कप्पा मला उघडून दाखविला. मावशीच्या आयुष्यांतली एक हळुवार बाब मला त्या वेळीं समजली—सारजा मावशी कोण्या एकें काळीं लग्न करणार होती !

मी आश्चर्यचकित झालों. विश्वास ठेवावा कीं नाहीं हा प्रश्न निर्माण झाला... आणि नंतर मावशी म्हणाली की, ती ज्याच्याशीं लग्न करणार होती तो इसम हरी होता !

होय !—तोच भाडेकरी—तोच हरी !—मला आठवलें—

'होय—तोच भाडेकरी—' मावशी म्हणाली.

'मग लग्न कां नाहीं केलें ?—' मी विचारलें.

ती हंसली आणि तिच्या ट्रंकेंतला किल्ल्यांचा जुडगा काढून आणण्यास तिनें मला सांगितलें. मी जुडगा तिला दिला. थरथरत्या हातांनीं तिनें त्यांतली एक किल्ली मला दिली आणि सैपाकघरांतील आढ्यावर ठेवलेली लहानशी पेटी आणण्यास

सांगितलें. मी ती पेटी आणली. पेटीला कुलुप होतें. मावशीनें दिलेल्या किल्लीनें मी तें उघडलें. त्यांतून तिनें एक पिवळट रंगाचें जीर्ण झालेलें पाकिट काढलें. पाकिटांत एक फोटो होता. बऱ्याच वर्षांपासूनचा ठेवणींतला असावा. पिवळट–लालसर झाला होता. त्याच्यामागें कांहीं तरी लिहिलें होतें. हस्ताक्षर ओळखीचें वाटलें—आणि मग मी आश्चर्यानें सर्द झालों !–तें माझेंच हस्ताक्षर होतें. तें पत्र लिहिलें त्या वेळीं मी अकरा वर्षांचा होतो. वडिलांसोबत दुसऱ्या गांवीं गेलो होतो. सोबत माझा चुलतभाऊ होता. आम्हीं उतरलो होतो त्या घरीं एक पोस्टकार्ड सांपडलें. पोस्ट-कार्डावर एकीकडे एक चित्र छापलें होतें. त्यांत एक वयस्क बाई, एका वयस्क माणसाशेजारीं बसून गप्पा मारीत असल्याचें दाखविलें होतें. चित्र मोठें मजेदार होतें. मला नि माझ्या चुलतभावाला तें पाहून खूप मजा वाटली. तें मावशीला पाठविण्याचें आम्हीं ठरविलें. कार्डाच्या मागें थोडासा मजकूर लिहिला व तें मावशीला पाठवून दिलें.

नंतर मावशी सांगू लागली––"हरी रात्रपाळीच्या कामावर होता. पुतळी-घरांतून तो पहाटे परत येई. कित्येकदां तो येई त्यावेळीं मी झोंपलेली असायची. एकें दिवशीं तो कामावरून परत आला. हें पत्र त्याला सांपडलें. त्यानें पाहिलें. वाचलें. आणि नंतर........"

मी घोटाळ्यांत पडलों. ती सांगू लागली—"हरीसंबंधीं आणि माझ्या-संबंधीं लोक नाहीं नाहीं तें बोलनात, अशी त्याची समजून झाली असावी. ह्या चित्रासंबंधीं आणि मजकुरासंबंधीं त्यानें गैरसमज करून घेतला. मजकूर त्याला नीटसा समजला नसावा. लोक आपल्यासंबंधीं अशा तऱ्हेची चर्चा करतात हें त्याला आवडलें नाहीं. तो गरीब असला, तरी त्याला स्वतःच्या अब्रूची आणि मानाची चाड होती......"

"पण......पण" असें म्हणत तिनें पुन्हां त्या पत्रांतील चित्राकडे पाहिलें. माझ्या डोक्यांत लख्ख प्रकाश पडला. चित्रांतील म्हातारा–म्हातारीनें हा घोंटाळा केला होता. अशीं चित्रें पाठवून गांवांतले सारे लोक आपली टिंगल करतात अशी हरीची खात्री झाली होती. गंमतीखातर केलेल्या गोष्टीचा विपर्यास झाला।

होता. मला विषाद वाटला. मी विचारलें—"...पण मावशी, ह्या एका चित्राची गोष्ट सोडून दिलीं, तर तूं खरोखरीच हरीशीं लग्न केलें असतेस कां?"

मावशीनें मान हलविली.

तो होकार होता.

मी सुस्कारा टाकला व म्हणालो—"मावशी, माझ्या हातून असें घडलें नसतें तर बरें झालें असतें. वाईट वाटतें. मला माझाच तिरस्कार वाटूं लागला आहे—"

"हं-हं!" मावशी म्हणाली, "असं कांहीं बोलायचं नाहीं. स्वतःचा तिरस्कार वाटायला काय झालं?"

त्यानंतर ती पुन्हा या विषयावर कधीं बोलली नाहीं. मरणापूर्वीं कांहीं घटका ती सारखी बरळत होती—"हरी-हरी...माझा हरी!"

मावशीच्या दोन मैत्रिणी शारदा आणि गिरजा जवळच बसल्या होत्या. मरणोन्मुख मावशीच्या तोंडचे शद्ब शारदेला तिच्या बहिरेपणामुळें ऐकूं येत नव्हते—पण तिच्या डोळ्यांतून अश्रुसरी वहात होत्या. मावशीच्या तोंडून बाहेर पडलेलें हरीचें नांव ऐकून, ओंठावर बारीक केंस असलेला गिरिजा मात्र मला उद्देशून म्हणाली—"हरी!-हरी!-हरी म्हणजे हरी होता!-त्याची बरोबरी तुमच्यासारखीं पोरंसोरं करणार नाहींत!—मोठा माणूस...!" गिरिजेच्या बोलण्यांत आजहि आमच्या संबंधींचा राग-द्वेष-कायम असलेला दिसला. मी त्याची पर्वा केली नाहीं. मान हलविली. डोळे पुसले.

कांहीं असो. त्या छोट्याशा घरांत आमची सारजा मावशी राहिली-जगली-आणि तेथेंच संपली, एवढेंच मला ठाऊक आहे. तिची वागणूक आणि जीवन म्हणजे सुवाच्य अक्षरांत लिहिलेली एक विशुद्ध प्रेमाची आणि निर्व्याज जीवनाची-शुद्ध-स्वच्छ-गाथा आहे!-इतक्यावरहि तिच्या भावनांचें गूढ मला अद्याप कळलें नाहीं-आणि माझ्या भावनांचे गूढ तिलाही कळलें नाहीं—

म्हातान्या सारजा मावशीची ही छोटीशी कहाणी संपली. राजाबाक्षाच्या रस्त्यानें आजहि जाऊन पहा–कांहीं अंतरावर पडक्या स्वरूपांतलें आणि आज निष्क्रिय झालेले एक लाल विटांचे पडके जिन दृष्टीस पडेल—त्याचे लाल रंगाचे लोखंडी भोंगे दिसतील—पण त्यांतून पूर्वी बाहेर पडणारा धूर आज दिसणार नाहीं ...दोन शेतांच्या अंतरावर एक जुनाट रामाचें देऊळ दिसेल–आणि शेजारीं एक चार खोल्यांचें खसकें, झोंपडीवजा जुनें घर दिसेल !–म्हातान्या सारजा मावशीचें ते वैराण एकांतिक घर आहे तेथें कोणी रहात नाहीं–कोणी फिरकत नाहीं!– काळाच्या ओघांत तें घरसुद्धां आज ना उद्यां सारजा मावशीप्रमाणेंच जमीदोस्त होईल...!

---

## मथळा नसलेली गोष्टः—......................७

"कम् इन" खोलीच्या आंतून कांहींसा आतुर पण बराचसा करडा असा आवाज ऐकूं आला आणि त्यासरशीं एक चोवीस–पंचवीस वर्षांचा तरुण इसम दार उघडून आंत आला. खोलींतील गृहस्थानें त्या तरुणाला टेबलासमोर ठेवलेल्या खुर्चीवर बसावयास सांगितलें आणि नंतर टेबलावर ठेवलेल्या कागदपत्रांकडे दृष्टि-क्षेप टाकीत साहेबी थाटांत त्यानें विचारलें, "बोला, मी तुमच्यासाठीं काय करूं शकतो ?"

तरुणानें खुर्चीवर बसल्यानंतर आपल्या कपाळावर रुळणारी केंसाची बट मागें सारीत एक आवंढा गिळीत म्हटलें, "मी येथील एका वसती–गृहांत रहात असतो. तेथील मुलें नेहमीच सांगतात कीं, नवख्या लेखकाला एखाद्या संपादकाला जाऊन भेटणें देखील कठीण असते–मग अशा संपादकाच्या संपादकत्वाखालीं प्रसिद्ध होणाऱ्या मासिकांत नवख्या लेखकांच्या गोष्टी प्रसिद्ध होणें दूरच राहिलें !"

त्यानें आपल्या आंतल्या खिशांतील एक लांब पाकिट काढीत आणि ते संपादका-समोर ठेवीत म्हटलें, " साहेब, मी एक गोष्ट लिहिली आहे. माझ्या मतें ती एक अप्रतीम स्वरूपाची लघुकथा आहे. आपण ती वाचावी अशी विनंति आहे. आपणांस आवडेल. आणि आवडल्यास ती आपण आपल्या मासिकांत प्रसिद्ध करावी. त्याबद्दल मला थोडाफार मोबदला मिळाल्यास मी आपला अत्यंत आभारी होईन."

संपादकाच्या तोंडून बाहेर पडणारा निःश्वास त्याला आवरतां आला नाहीं. तो तरूण खोलींत येण्यापूर्वी चपराशानें आणून दिलेली त्याच्या नांवाची चिठ्ठी पहात संपादक म्हणाले, " तुम्ही ह्या चिठ्ठींत लिहितां कीं, तुमचें काम फार महत्वाचें आहे...आणि......"

" आणि साहेब, अद्यापहि माझें तेंच म्हणणें आहे." तो तरुण उत्तरादाखल म्हणाला, " ह्या लघुकथेची जनतेला लवकरच फार गरज भासणार आहे—जनतेला ज्या वेळीं समाधानाची गरज भासेल त्या वेळीं ह्या गोष्टीचा खात्रीने अत्यंत उपयोग होईल—आणि ती वेळ आतां कांहीं फार दूर नाही !—आणि आणखी एक गोष्ट तुम्हांला सांगावयाची म्हणजे, ही माझी अगदी पहिलीच लघुकथा आहे."

" मला वाटलंच !" संपादकानें थंडपणें म्हटलें. नंतर त्यानें हस्तलिखिताकडे नजर टाकीत म्हटलें, " आणि तुम्हीं गोष्टीचा मथळासुद्धां लिहायला विसरलांत !"

" नाहीं, मी विसरलों नाहीं—पण खूप विचार करूनसुद्धां योग्य असा मथळा मला सुचूं शकला नाहीं."

" तुमच्या ह्या लघुकथेचें एकंदर स्वरूप कशा प्रकारचें आहे ?" संपादकानें हंसत हंसत कुत्सितपणें विचारलें.

" युद्धविषयक !"

" आम्हांला आतां युद्धविषयक कथा मुळींच नकोत. वीट आला आहे त्यांचा अगदी ! लोकांनाही तशा कथा आवडत नाहीत. ज्या बिचाऱ्यांचे नातलग

किंवा मित्र युद्धांत गमावले, त्यांना त्यांच्या दुःखाची पुन्हां आठवण व्हावी अशी इच्छा नाहीं; आणि ह्या दुःखाचा ज्यांना संपर्क लागलेला नाहीं, त्यांना त्या दुःखाची उगांच टोंचणी लाऊन घेण्याची गरज भासत नाहीं...तुमचं हें नांव मला जरा आकर्षक वाटलं—'वाय. बी.'!......"

तरुणानें साशंकपणें उगाच मान डोलविली.

"लघुकथा लिहिण्याचा हा नसता उपद्व्याप करण्याचा तुम्हांला सल्ला तरी कोणी दिला?" संपादकानें विचारलें.

"कुणीच नाहीं." वाय्. बी. म्हणाला "एकाएकीं सुचलें आणि खूप वाटलें म्हणूनच लिहून काढली ही लघुकथा. मी ज्या वसतीगृहांत रहातों तेथून जवळच असलेल्या एका जागीं एक मुलगी रहाते. त्या दिवशीं तिला सरकारांतून एक पत्र आलें होतें आणि तिचा नवरा लढाईत मारला गेल्याचें कळविलें होतें. ती बिचारी सारखी रडत होती. मी तिचें नाहीं नाहीं त्या रीतीनें समाधान करण्याचा प्रयत्न केला—पण व्यर्थ! लढाईचें नांव निघतांच ती वेड्यासारखी होऊन जाते!"

"तें कांहींहि असो. पण अशा तऱ्हेच्या सर्वसामान्य युद्धविषयक कथांना आमच्या मासिकांत स्थान देतां येत नाहीं ह्याबद्दल दिलगीर आहे. युद्ध संपल्यानंतर शांततेच्या काळांत जें वाचूं शकतील आणि वाचल्यानंतर ज्याच्या संबंधी लोकांत चर्चा होईल असें कांहीं तरी लिहा—मी त्याला अवश्य स्थान देईन."

वाय्. बी. चा चेहेरा एकदम बदलला. त्याचे साधारण मोठे डोळे औदासिन्यानें दाटून आले. त्या दुःखित नजरेनें तो बराच वेळ संपादकाकडे पहात राहिला. नंतर त्यानें विचारलें, "ह्या युद्धांत तुमचं असं कोणी गमावलं आहे का?"

"माझा मुलगा" संपादक म्हणाला "माझा एकुलता एक मुलगा!"

नंतर कांहीं वेळ कुणीच कुणाशीं बोललें नाहीं. वाय. बी. च्या तोंडून अभावितपणें शब्द बाहेर पडले, "मग तुम्हीं ही गोष्ट अवश्य प्रसिद्ध करा!" हे शब्द उच्चारतांना त्याचा गळा दाटून आला होता.

" ठीक आहे—वाचून पाहीन. " तडजोडीच्या स्वरांत संपादक म्हणाला, " उद्योन्मुख लेखकांना उत्तेजन द्यावें असें मला वाटते. पण एक गोष्ट स्पष्ट सांगून टाकली पाहिजे. ह्या धंद्यांत भांडवल दुसऱ्याचं असतं. तेव्हां जोखीम सांभाळायला नको का ?...मी नुसता संपादक आहे—पण मासिकाचा मालक दुसराच आहे. "

त्या दोन साधारण मोठ्या डोळ्यांत किंचित् आत्मविश्वास चमकला.

" हे बघा, लढाईमुळें सारेंच धंदे थंडावले आहेत. युद्धापूर्वी आमचा हा धंदा भरभराटीचा होता. " त्या नवरख्या तरुणाकडे पाठ फिरविण्याची इच्छा असूनहि तें त्याला शक्य झाले नाहीं आणि तो सांगू लागला, " पण आतां काळच बदलला आहे. भांडवलदारांची इच्छा आतां ह्या धंद्यांत पैसा गुंतविण्याची नाहीं. आमच्या मासिकाच्या मालकाचेंहि तसेंच झालें आहे. ह्या वेळीं जरी मी तुमची गोष्ट प्रसिद्ध केली, तरी तुम्हांला एकदां खानावळींत जेवतां येईल इतकेसुद्धां पैसे मोबदल्यादाखल मला देतां येतील किंवा नाहीं ह्याची शंका वाटते. परिस्थिति ही अशी आहे. काळ मोठा वाईट आला आहे—त्याला कोण काय करणार !—"

" साहेब, युद्ध कांहीं फार दिवस टिकणार नाहीं " वाय्. बी. म्हणाला.

" नाहीं. तुम्हीं म्हणतां तें खरं आहे. " संपादक औदासिन्यपूर्ण स्वरांत म्हणाला, " आणि मी सुद्धां फार काळ आयुष्यांत टिकून राहीन, असंहि मला वाटत नाहीं. गेल्या आठवड्यांतच माझी पन्नाशी संपून एकावन्नावं वर्ष लागलं. माझा हा मासिकाचा धंदा बुडाला, तर त्यासोबत मीहि बुडालो म्हणून समजा ! पण हें सर्व मी तुम्हांला कां सांगत सुटलो तें माझें मलाच कळत नाहीं ! "

" मला ठाऊक आहे " वाय्. बी. चटकन म्हणाला. " तुम्हांला तुमच्या मुलाची आठवण होते आहे–समाधानासाठीं तुमचें हृदय आसुसलें आहे ! "

" खरंच ! " संपादक आपल्या भावना लपविण्याचा प्रयत्न करीत म्हणाला, " हजारांत मी एकटाच असेन कदाचित असा !–म्हणूनच युद्धाच्या गोष्टी छापूं नयेंत असं वाटतं. पण तें जाऊं द्या. तुम्हीं तरूण आहांत. तुमच्यावर कोणाचीहि जबाबदारी नाहीं असं मला वाटतं ! "

"होय. जगांत मी अगदीं एकटा आहे." वाय्. बी. म्हणाला "पण जगतां जगतां जगाच्या वाटेवर जे भेटतील त्यांची ओळख व्हावी—मैत्री व्हावी अशी माझी इच्छा असते. आयुष्यांत अनेक शत्रू गोळा करण्यापेक्षां थोडे मित्र मिळालेले बरें."

"हं!" पूर्वीच्या औदासिन्यपूर्ण स्वरांत संपादक बोलूं लागला "माझा मुलगा लढाईत मारला गेल्याचें मला ज्या क्षणीं समजलें, त्या क्षणांपासूनच मला सर्व शत्रूसारखें झालें—शत्रूशिवाय दुसरें कोणीच त्यानंतर मला भेटले नाहीं. एक नाहीं, शंभर नाहीं, हजार नाहीं, लक्षावधी शत्रू—एक संपूर्ण राष्ट्रच माझ्या मनांत शत्रुरूपानें वास्तव्य करून राहिलें आहे!—त्या शत्रूविषयीं आतां मला माझ्या उर्वरित आयुष्यांत नेहमीच तिरस्कार वाटत राहील!"

नंतर त्यानें एक आवंढा गिळला. थोडा वेळ स्तब्ध बसून राहिला. नंतर विषय बदलण्याच्या हेतूनें म्हणाला, "होय—पण तुमच्या गोष्टींतला मुख्य मुद्दा कोणता?"

"क्षमाशीलता!" वाय्. बी. नें उत्तर दिलें.

"हं!...मला वाटलंच. पण तें ठीक नाहीं."

"तुम्हीं ती गोष्ट एकदां वाचावी अशी माझी इच्छा आहे. मी उद्योन्मुख लेखक आहे. मला त्याची जाणीव आहे. पण ती गोष्ट तुम्हांला आवडेल अशी मला खात्री वाटते आणि मोबदल्यासंबंधीं म्हणाल, तर आतां मला त्याबद्दल फारशी फिकर वाटणार नाहीं एवढेंच सांगतो. पण एक आंतली गोष्ट सांगून टाकूं का?"

संपादक कांहींच बोलला नाहीं.

"शेजारच्या अनाथालयांत रहात असलेल्या एका मुलीसाठीं मी ती गोष्ट लिहिली आहे. तुमच्या मासिकांत ही गोष्ट प्रसिद्ध झाल्यानंतर मी ती तिला वाचून दाखविणार असल्याचें सांगितलें होतें."

"ठीक आहे—मी ती वाचीन. पण निराशा झाली तर रागावूं नका. ज्या अर्थी तुम्हीं गोष्टीला मथळा दिलेला नाहीं त्या अर्थी ह्या प्रांतांत तुम्हीं अगदींच नवखे आहांत हें मघाशींच मी ओळखलें."

"हं!—आतां आठवलं" वाय्. बी. विचारपूर्वक म्हणाला "मला मथळा सुचला नव्हता असं नाहीं. पण ती लघुकथा मथळ्याशिवायच छापण्यांत अधिक मौज आणि स्वारस्य आहे असं वाटतं. वाचकांना जर ती विशेष आवडली, तर त्यांनाच आपणहून गोष्टीला मथळा सुचवूं द्या."

नंतर संपादकानें धंदेवाईक निःस्पृहतेचा आव आणून घड्याळाकडे पाहिलं व वाय्. बी. चें हस्तलिखित टेबलच्या कप्यांत ठेवीत म्हटलें, "उद्यां याच वेळीं या. सांगीन काय तें."

नंतर वाय. बी. तेथून निघून गेला.

"क्षमाशीलता!" संपादकाला त्या शब्दाची आठवण झाली आणि त्याच्या डोक्यांत विचारचक्र सुरूं झालें—"गेल्या पांच वर्षांत लक्षावधी लोक मेले आणि जखमी झाले...इतक्यावरहि क्षमाशीलता आहेच!" नंतर त्यानें टेबलाच्या कप्यांतून अभावितपणें हस्तलिखित बाहेर काढलें व तो लक्षपूर्वक वाचूं लागला. दुसरें पान वाचून होतांच, आपण लेखकाशीं वादविवाद करीत आहोंत असें त्याला वाटलें. अशा मनःस्थितींत त्यानें तें हस्तलिखित संपूर्ण वाचून काढलें आणि 'प्रसिद्धीकरणास योग्य पण मोबदला कमी द्यावा' असा शेरा लिहून परत कप्यांत ठेवून दिलें.

—आणि त्यानंतर रात्रभर त्या लघुकथेसंबंधीं संपादक विचार करीत होता. ती लघुकथा वाचल्यानंतर आपलें मनःस्वास्थ्य कां ढासळावें हेंच त्याला कळत नव्हते. सकाळ झाली तेव्हां त्याला वाटलें कीं, आपली व वाय्. बी. ची गांठ पडली नसती तर बरें झालें असते!

संपादक ज्या इमारतींत रहात होता ती इमारत चार मजली होती. चवथ्या मजल्यावर तो रहात असे. त्या जागेखालींच तिसऱ्या मजल्यावरील एक

खोलींत एक साधारण वयस्क बाई रहात असे. ती विधवा असावी. तिचे डोळे काळेभोर नि टप्पोरे होते आणि ती फारच सुंदर हंसत असे. जातां–येतांना ती कित्येकदां जिन्यांत उभी राहून संपादकाशीं गप्पा करीत असे. पण ज्या दिवशीं तिनें संपादकाचा मुलगा लढाईत मारला गेल्याचें वर्तमानपत्रांतून वाचलें त्या दिवशीं प्रथमच ती आपणहून संपादकाच्या खोलीत आली होती आणि म्हणाली होती, "......तुमच्या मनाला किती यातना होत असतील ह्याची मला नीट जाणीव आहे––कारण मलाहि त्या यातनांचा अनुभव आहे! माझा जीव की प्राण असलेला एक माणूस ह्या युद्धांत नुकताच मारला गेला. त्या मेल्यांनीं त्याचा प्राण घेतला!......"

सकाळ झाल्यावर संपादक नेहमीप्रमाणें जेव्हां आपल्या कचेरींत जाण्यास निघाला, तेव्हां दररोजसारखी ती टप्पोऱ्या डोळ्याची बाईहि त्याला भेटली आणि नेहमीसारखाच तिनें प्रश्नहि केला, "काय आहे नवी खबर?"

"होय!–खूप जंगी खबर आहे!"

आणि खरें पाहिलें तर त्यानें त्या दिवशीं सकाळीं वर्तमानपत्र उघडूनहि पाहिलें नव्हतें. वायू. बी. च्या त्या लघुकथेमुळें त्याच्या मनाचें धरबंद सुटले होते. वायू. बी.!––एक अनोळखी नवखा तरुण!–...

संपादक कचेरीत पोंचल्यानंतर थोड्याच वेळांत टेलिफोनची घंटा वाजली. मासिक चालविणारा मालक संपादकाशीं बोलत होता, "हे बघा संपादकसाहेब, मला मासिकाचा खप वाढलेला पाह्यचा आहे....नफा झालेला पाह्यचा आहे... नाहीं तर ही मासिक पत्रकें चालवून मला काय समाधान?...गेल्या महिन्याचा अंक मी अगदीं पहिल्या पानापासून तो शेवटल्या पानापर्यंत वाचून काढला. प्रत्येक पृष्ठामागें तुम्हीं लेखकांस किती पैसे दिलेत तें देव जाणे-पण माझ्या खिशांतून जे पैसे गेले, त्याला योग्य असें ते लेख नव्हते एवढें मात्र खरें! हें बघा–मला पैसा हवा आहे आणि पैसा आणील असेच लेख माझ्या मासिकांत यावयास हवेत......आणि बघा धनुष्याकृति भुवयांची छटेल वर्णनें किंवा निव्वळ शाब्दिक जादुगिरीवर साहित्याची दौलत उभारणारे फडतूस लेखक आतां

आपल्याला नकोत. लोकांना नवें कांहीं तरी हवें आहे—त्यांच्या भावनांना हलवून सोडणाऱ्या लिखाणाची गरज आहे...तसं कांहीं छापा आणि पैसा आणा........."

संपादकानें आणखी तीन-चार वेळां वाय्. बी. ची गोष्ट वाचून पाहिली. गोष्ट प्रसिद्ध करण्याचा त्यानें मनाशीं निश्चय केला.

नंतर ठरल्याप्रमाणें वाय्. बी. आला. वाय्. बी. नें आतुरतेनें पहिला प्रश्न विचारला, " तुम्हीं गोष्ट वाचलीच असेल—काय मत आहे तुमचं ? "

" गोष्ट कांहीं वाईट नाहीं " संपादक उत्तरला " आपण त्या गोष्टीसंबंधी थोड बोलूं या. अशाच गोष्टी आणखी लिहिल्यास तुम्हीं खात्रीनें प्रथितयश लेखक व्हाल. आपण दोघांनीं मिळून ती गोष्ट वाचल्यास तुमची कांहीं हरकत आहे काय ! "

" माझी कांहींच हरकत नाहीं " वाय्. बी. म्हणाला.

" कथानक कांहींसें नाट्यात्मक आहे " संपादक हस्तलिखिताकडे पहात बोलत असला, तरी वाय्. बी. चे डोळे आपल्याकडे रोखून पहात आहेत त्याची त्याला जाणीव होती " तुमच्या गोष्टींत बराच पाल्हाळहि आहे. आजकाल लोकांना लांबण आवडत नाहीं. कांहीं असो. तुम्हांला मदत करावी अशी माझी इच्छा आहे ह्या गोष्टीच्या मोबदल्यांत तुम्हांला दहा रुपये देईन—चालेल का ? "

वाय्. बी. चा चेहेरा फुलला. भावना उचंबळून येऊन तो म्हणाला, " तुम्हीं देऊं केलेले पैसे खात्रीनें उपयोगी पडतील !—माझ्या उपयोगी नाहीं; तरी अनाथालयांतील त्या मुलीच्या खात्रीनें उपयोगी पडतील ! कालच मी तिच्यासंबंधी तुम्हांला सांगितलं नाहीं का ? अगदींच अकाली तिचा नवरा वारला आणि त्यानें तिच्यासाठीं मागें कांहींसुद्धां ठेवलेलें नाहीं ! "

" हे बघा. आमचं मासिक तसं गरीब आहे. " संपादक म्हणाला, " नाहीं तर याहीपेक्षां अधिक मोबदला दिला असता. शिवाय, ही गोष्ट प्रसिद्ध करण्यांत

मी थोडी जोखीमच घेतो आहे, हेंहि सांगून टाकलें पाहिजे. किती वेळांत लिहिली तुम्हीं ही गोष्ट ?"

"जवळ जवळ तीन तासांत" वाय्. बी. नें उत्तर दिलें.

"नवख्या लेखकाच्या मानानें तुम्हीं फारच लवकर लिहितां ! माझ्या मतें गोष्टींतल्या आई-बापाच्या भावनांचें विशदीकरण तुम्हांला नीटसें साधलेलें नाहीं. वाचकाच्या मनाची पकड घेतली नाहीं तर मजा नाहीं...तुम्हीं अगदीं एकटे आहांत असं तुम्हीं सांगितलं होतं—होय ना ?"

वाय्. बी. नें नुसती मान हलविली.

"ह्या गोष्टीतल्या बापाचें पात्र घ्या. त्याचें आपल्या मुलावर निरतिशय प्रेम होतें-अगदी माझें माझ्या मुलावर होते तसें ! इतक्यावरहि त्याचा मुलगा शत्रूच्या हातीं लागला, तेव्हां तें तो मोठ्या धैर्यानें सहन करीत होता आणि स्वतःची समजूत घालण्याचा प्रयत्न करीत होता, असें तुम्हीं दाखविलें आहे. माझा मुलगा खंदकांत उभा असतांना मी जर त्याच्याजवळ उभा असतो आणि त्याच वेळीं शत्रूनीं त्याच्यावर हल्ला केला असता, तर मी तसाच उभा राहून, माझा मुलगा महान् उदात्त हेतूनें मृत्युमुखीं पडतो आहे किंवा नाहीं ह्याचा विचार करीत राहिलो असतो का ? त्याच्यासाठींच मी जगलो, त्यानेंच मला सुख-समाधानाचा ठेवा दिला ! तो माझा होता-तो माझाच अंश होता. तुम्हांला त्याची जाणीव होऊं शकते का ?"

"मला तुम्हांला एक प्रश्न विचारावयाचा आहे" वाय्. बी. म्हणाला, "तुम्हांला तो मुलगा कोणी दिला ? तो मुलगा तुमचा होता असें कोण म्हणतो ? तुमच्यासाठीं, तुमच्या आनंदासाठीं नि तुमच्या समाधानासाठीं ईश्वरानें त्याला जन्मांला घातलें होते असें तुम्हांला वाटते काय ? जगाचा त्याच्यावर मुळींच हक्क नव्हता असें तुमचें म्हणणें आहे काय ? तुमच्यासाठीं हा सुख—समाधानाचा ठेवा निर्माण करून ठेवणाऱ्या, तुम्हांला ज्यानें घडविलें त्या महान् उदात्त परमेश्वराचें उपकार फेडण्यासाठीं तुम्हीं कांहीं तरी केलें आहे काय ?"

" पण माझं ऐका, वाय्. बी.! " संपादक मोठ्या आवाजांत म्हणाला " हा प्रसंग वर्णन करीत असतां तुम्हीं म्हणतां कीं, बाप आणि मुलगा मिळून एकाच शत्रूशीं लढत होते. बापानें मुलाला बोलावून आपल्याजवळ आश्रय दिला असता तरी मुलाचें प्राण सहज वाचूं शकले असते. पण बाप आपला विचारच करीत राहिला आणि स्वतःशीं म्हणाला...थांबा मी त्या ओळींच वाचतो—' टेहळणी करीत उभ्या असलेल्या बापानें आपल्या मुलाला पाहिलें. आग पिऊन धांवणाऱ्या शत्रूंनीं त्याच्यावर हल्ला केला होता. मुलावर शत्रूचे वार होत होते. लाथा—बुक्यांनीं त्याचा चेंदामेंदा करणें चालूं होतें. त्या गर्दीतूनहि वर डोकावून, त्यानें टेहळणीच्या जागीं बसलेल्या आपल्या बापाकडे पाहिलें—पण त्याच्या तोंडून शब्द बाहेर पडूं शकला नाहीं. तो शत्रूच्या हल्यामुळें अर्धमेला झाला होता. त्याचें सर्व तोंड रक्तबंबाळ झालें होतें. तरी त्याचा बाप स्तब्धच होता. त्याच्या मुलाचा मृत्यु अधिकाधिक जवळ येत होता. माणसाने मरावें कसें हें झोंपी गेलेल्या सैनिकांना तो शिकवीत होता '—वाय्. बी. ह्या तुमच्या लिहिण्याचा अर्थ तुम्हीच सांगा ! "

" त्याचा अर्थ मी सांगेन " वाय्. बी. म्हणाला " पण आणखी थोडें पुढें वाचा. शत्रूला ज्या गोष्टींचा अत्यंत तिरस्कार वाटत होता त्या सर्व गोष्टी त्या मुलानें आपल्या मनांत ठेवल्या होत्या, ह्या गोष्टाकडे तुम्हीं कानाडोळा करूं नका. ज्या महत्कार्यासाठीं तो स्वतः आणि त्याचे सोबती लढत होते, त्या कार्याचा सुगावा, तो फितूर झाला असता, तर शत्रूला सहज लागला असता–तसें करणें त्याला कांहीं अशक्य नव्हते. छळ असह्य होऊन मुलानें जर रहस्य सांगून टाकलें असते, तर शत्रू जिंकला असता.—पण तुम्हीं पुढें तर वाचा. "

" पण जवळ उभें राहून पहात असलेल्या बापाला हें सर्व कसें सहन करवलें तेंच मनाला पटत नाहीं. जर माझा मुलगा असता..."

" कल्पना करा तो तुमचाच मुलगा होता. आणि मग त्या गोष्टींतल्या बापाने आपलें मन दगडासारखें घट्ट करून तशी स्तब्धता कां स्वीकारली ह्याचा विचार करा. "

" मी पुढें वाचतो " संपादक दाटून आलेल्या स्वरांत म्हणाला आणि नंतर तो वाचूं लागला—" रहस्य सांगितल्यास आपण तुझी मुक्तता करूं असें शत्रुपक्षाचे लोक त्याला वारंवार सांगत होते. परंतु अतिमानुषालाहि लाजविणारें त्याचें धैर्य आणि मृत्यूचें दणकट आघात सहन करण्याची त्याची सहनशीलता पाहून शत्रूंच्या चवताळण्याचें रुपांतर त्यांना वेडें करून सोडण्यांत झालें ! "

संपादकाच्या हांतून हस्तलिखित गळून पडलें आणि तो उद्गारला, " ह्यावर कोणाचाहि कधीं विश्वास बसणार नाहीं ! "

" प्रत्येकाचा विश्वास बसेल !" वायू. बी. आत्मविश्वासानें उद्गारला.

" पण माझा विश्वास बसणार नाहीं! माझ्या मुलाचा जर तसा छळ झाला असता, तर मी क्षमाशीलता स्वीकारली असती असं वाटतं का तुम्हांला ? "

वायू. बी. चे साधारण मोठे डोळे चकाकले. नंतर तो उत्तरला, " माझ्या गोष्टींतील मुलाप्रमाणेंच तुमच्याहि मुलाला मृत्यु झाला आहे. फरक इतकाच कीं, तुमचा मुलगा अनन्वित छळ होऊन मेला असेल ! तुम्हांला त्या क्षमाशीलतेचा तिरस्कार येतो—कारण, मृत्यु आणि आत्मत्याग ह्यांतील फरकच तुम्हांला मुळांत कळत नाहीं. आत्मत्याग म्हणजे मृत्यु असूं शकत नाहीं हें मी त्या गोष्टीत दाखविलें आहे ! "

" माझा मुलगा मेला आहे..." संपादक कळवळून म्हणाला.

परंतु त्याचें बोलणें पूर्ण होण्यापूर्वीच वायू. बी. म्हणाला, " पुढें तर वाचा—नंतर तह झाला—जगावर आलेलें अरिष्ट नाहींसें होईल, सर्वत्र सुव्यवस्था होईल त्या वेळीं तुमचा मुलगा मेला असं तुम्ही म्हणणार नाहीं ! स्वातंत्र्यांत जन्मास आलेल्या प्रत्येक मुलाकडे, त्याच्या डोळ्यांतील तेजाकडे तुम्ही ज्या वेळीं पहाल, त्या वेळीं तेथें तुम्हांला तुमच्या पोटच्या गोळ्याचें अस्थित्व आढळून येईल ! स्वतंत्र वातावरणांत जन्माला येणारी ही मुलं, आजच्या ह्या आत्मसमर्पणांतूनच उद्यां निर्माण झालेली असतील हें विसरूं नका ! थोडा विचार करा आणि ह्या प्रचंड प्रस्तरापलीकडे दृष्टि फेंका—तो प्रचंड प्रस्तर म्हणजे नव्या जगाच्या उभारणीचा

कोनशीला आहे ! –पहा, त्या पलीकडे पहा–अद्यापहि मुके असलेले अनेक जीव तुम्हाला तेथें दिसतील ! "

"होय...होय !" संपादक क्षीण स्वरांत म्हणाला. नंतर तेथें कांहीं वेळ विश्रब्धता निर्माण झाली. नंतर तो म्हणाला, "तुम्हीं येण्यापूर्वी मला ही गोष्ट जितकी आवडली होती, त्यापेक्षां कितीतरी पटीनें अधिक आतां ती मला आवडूं लागली आहे ! पण इतर अनेक लोक तुमच्या ह्या म्हणण्याला राजी होतीलच असं मात्र अजूनहि मला वाटत नाहीं."

कांहीं वेळानें संपादकाचा निरोप घेऊन वायू. बी. निघून गेला आणि मासिकाचा अंक बाहेर पडेपर्यंत त्यानें संपादकाची भेट घेतली नाहीं. एका पंधरवाड्यानंतर अंक प्रसिद्ध झाला. तीन दिवसांच्या आंत अंकाच्या जादा प्रती काढाव्या लागल्या. मथळा नसलेल्या गोष्टीची सर्वत्र वाहवा होत होती. गोष्टीची प्रशंसा करणाऱ्या शेंकडो पत्रांचा खच संपादकाच्या टेबलावर पडला. त्या सर्व पत्रांत संपादक रहात असलेल्या इमारतींतील तिसऱ्या मजल्यावरील त्या टप्पोऱ्या डोळ्यांच्या बाईचेंहि एक पत्र होतें.

मासिकाचा भरमसाट खप झालेला पाहून संपादकाच्या आश्चर्याला पारावार राहिला नाहीं. वायू. बी. सारखा लेखक, मोठ्या मोबदल्याची आशा दाखवून दुसऱ्या एखाद्या मासिकाचा संपादक ओढून नेईल अशीहि शंका त्याला आली. मासिकाचा मालकहि खूष झाला होता. असा लेखक हातचा जाऊं नये म्हणून त्यानें टेलिफोनवरून संपादकाला सांगितलें, "अशा लेखकाला हातचें जाऊं देणें बरें नाहीं. आलं कां लक्षांत ? त्याला हाताशीं धरा—इतर संपादकांची धाड पडण्यापूर्वी त्याला हाताशीं धरा. त्याला लेखमाला लिहायला सांगा व हवा तेवढा मोबदला द्या."

त्यानंतर वायू. बी. च्या शोधार्थ संपादक स्वतः त्या वसतीगृहांत जाऊन आला. परंतु एका आठवड्यापूर्वीच वायू. बी. तेथून गेल्याचे त्याला सांगण्यांत आलें. पत्रव्यवहार करूं म्हटलें तर कुणाहि जवळ त्याचा पत्ता नव्हता. वसतीगृहांत

तो पुन्हा गेला व तेथील एका इसमाला विचारलें, "वाय्. बी. चें अप्रकाशित लिखाण तरी तुम्हांला ठाऊक आहे का ?"

तेव्हां त्या गृहस्थानें उत्तर दिलें, "त्याचें लिखाणबिखाण कांहीं पाहिल्याचें मला आठवत नाहीं. पण कोण्या इसमासाठीं म्हणून, रॉयल एशियाटिक सोसायटींत जाऊन तो मोठमोठ्या ग्रंथांतील उतारे काढीत असे, एवढें मात्र मला ठाऊक आहे."

ग्रंथांतील उतारे! संपादक आपल्या मनाशीं विचार करीत कचेरींत परत आला. वाय्. बी. ची गोष्ट म्हणजे वाङ्मयचौर्य तर नसेल ना ?—त्या गोष्टींतील कल्पना खरोखरीच कांही अगदीं नवीन नाहीं. तशी कल्पना, फार पूर्वी आपण कुठें तरी वाचली असावी, असें त्याला पुसट पुसट आठवलें—आणि हा विचार येतांच त्याचें धाबें दणाणलें !

आणखी एक आठवडा निघून गेला. सर्वत्र मासिकाची मागणी चालू होतीच आणि आश्चर्याची गोष्ट अशी कीं, एके दिवशीं अचानकपणें वाय्. बी. संपादकाच्या कचेरींत येऊन थडकला.

"बोला, संपादक महाशय कसं काय ?" वाय्. बी. हंसत हंसत म्हणाला.

"संबंध पंधरवाडा मी मोठ्या फिकिरींत घालविला" संपादक म्हणाला, "मेहेरबानी करून एक गोष्ट खरी खरी सांगून टाका. ती मथळा नसलेली गोष्ट तुमची स्वतःचीच—म्हणजे तुम्हीं स्वतः लिहिलेली—म्हणजे तुमच्याच डोक्यांतून निर्माण झालेली आहे काय ?"

वाय्. बी. आपले साधारण मोठें डोळे किलकिले करीत म्हणाला, "नाहीं... कां बरें ?...मला वाटलें तुम्हांला ठाऊक असेल !"

"काय......काय म्हणालांत ?" संपादकानें खडबडून विचारलें.

"ती कथा—म्हणजे मूळ कथा—सर्वांनाच ठाऊक आहे. ती ज्याला ठाऊक नाहीं असा माणूस विरळा !"

" सर्वांना ठाऊक आहे ह्याचा अर्थ काय ?--आणि सर्वांना जर ती ठाऊक आहे, तर पंचवीस हजारावर मासिकाचा खप गेला कसा ?"

" आणि गोष्टीचा मथळा नाहीं कां सुचविला कुणी ?"

" जहन्नममध्यें गेला तो मथळा !" संपादकाचा चेहरा पांढरा फटफटीत पडला होता. " कोणत्या पुस्तकांतून तुम्हीं ती गोष्ट चोरलीत ?"

" मी ती अगदीं जशीच्या जशी चोरली असें म्हणतां येणार नाहीं. मूळ कथेंतच मी थोडा नवीन बदल केला आहे. आणि हें बघा, आजच्या जगांत नवीन असं तरी काय आहे ? आपले मोठे मोठे पुराणग्रंथ न्याहाळून पहा—त्या ग्रंथांतून आजच्या ह्या सर्व कथा-कादंबऱ्या अनेक वर्षांपूर्वीच सांगून टाकल्या आहेत. आजचे लेखक त्याच गोष्टींना निराळें रंगरुप देऊन आणि स्वतःला पुरोगामी नाहीं तर आधुनिक म्हणवून घेऊन पुन्हां लिहून काढीत असतात-त्यांची भाषा आणि पद्धत निराळी असते व तेंच तुम्हीं छापतां !—आपल्या पुराण-पुरुषांनी लिहून ठेवलं नाहीं असं जगांत काय आहे ?—"

" तें जाऊं द्या हो. पण तुम्हीं कोणत्या पुस्तकांतून ती गोष्ट चोरलीत तें मला हवं आहे." संपादक संतापून म्हणाला.

वायू.बी. नें हातांतलि पिशवींतून एक ग्रंथ हळूंच बाहेर काढला आणि शांतपणें तो त्यांतील पृष्ठें चाळूं लागला.

" महाभारत !" तो हंसत हंसत हलक्या आवाजांत म्हणाला, " हा ग्रंथ म्हणजे, जगाच्या इतिहासांतील आत्मसमर्पणाची एक अत्यंत उदात्त आणि तितकीच रम्य कथा आहे !"

# ती कर्तबगार होती....सुंदर होती !........८

त्याचें नाव नायब. त्याला त्याच नावानें सर्व ओळखीत. नायबचे व्यक्तित्व डोळ्यांत भरण्यासारखें होतें असें मुळींच नाहीं. तो तऱ्हेवाईक होता एवढें मात्र खरें. इतरांच्या डोक्यांत येणार नाहींत किंवा सर्वसाधारण लोकांच्या बुद्धीला पटणार नाहींत अशा लोकविलक्षण गोष्टी करण्याची त्याची नेहमीचीच संवय. त्याचें गतायुष्य कसें होतें हें कुणालाच ठाऊक नव्हते. तसेंच भविष्यांतील त्याच्या विधि-लिखितासंबंधींहि कुणी कयास बांधू म्हटलें तर तें अशक्य होतें. तो एकलकोंडा आणि तऱ्हेवाईक होता. एकलकोंडेपणा फारच जागवूं लागला कीं, स्वारी प्रवासास निघायची. खूप खूप भटकायचें. प्रवासास निघालेल्या माणसाची इच्छा, मोठमोठीं शहरें किंवा पौराणिक अथवा ऐतिहासिक ठिकाणें पाहण्याची असते. पण नायबचें सारेंच कांहीं विचित्र. सारे लोक करतील त्याच्या उलट आपण करायचें; सारे लोक जातील त्याच्या उलट दिशेनें आपण जायचें ही त्याची नेहमीची तऱ्हा. लोक-विलक्षण गोष्टी करणें हेंच त्याचें वैशिष्ठय नि व्यक्तित्व होतें. तेवढ्यामुळेंच काय तो, तो लोकांच्या डोळ्यांत भरायचा !—

एकदां नायबसाहेबांची स्वारी अशीच प्रवासास निघाली. दक्षिणेंतल्या एका मुसलमान संस्थानांतील एका छोट्याशा गांवीं तो आला. रमजानचें दिवस संपले होते आणि मोहरमचा सण सुरू झाला होता. पण त्याचें सारेंच निराळें. दिवाळी काय, दसरा काय किंवा मोहरम काय, सर्वच सण त्याला सारखे. सण दर वर्षी येतात आणि जातात, त्यांत मोठेंसें असें काय असणार !—त्याला तो सणासुदींचा गजबजाट नको होता. त्या गांवच्या स्टेशनवरून एक छोट्या लाईनचा फाटा दुसरी-कडे जात होता. त्या लाईननें प्रवास करावा असें त्याच्या मनांत आलें. पण गाडी सुटायला अद्याप तीन तास अवकाश होता. आतां काय करावें हा मोठा प्रश्न समोर

उभा राहिला. थोडा वेळ विचार केली. कांहीं तरी मानाशीं ठरविलें. तें छोटेसेंच गांव होतें. इकडे तिकडे भटकत राहिल्यास तीन तासांचा वेळ सहज निघून जाईल.

एकाद्या नवख्या गांवाचें वैशिष्ठ्य माणसाला ठाऊक नसते तोंपर्यंत तेथें राहण्यांत मौज असते. गांवांत ओळखीपाळखी झाल्या किंवा तेथील वैशिष्ठ्यपूर्ण गोष्टी कळल्या कीं, तो नवखेपणाचा आनंद नाहींसा होतो हें त्याला ठाऊक होतें आणि म्हणूनच तो नवीन ओळखी काढण्याच्या भानगडींत कधीं पडत नसे. माणसें आणि माणसांचें व्यवहार सर्वत्र सारखें असतात. घर–दार, बायका–मुलें, बाजार–हाट, क्रय–विक्रय ह्याच गोष्टी सर्वत्र चाललेल्या असतात. तसें पाहिलें तर जगांत नवीन असें कांहींच नसते. नायब खरोखरीच मोठा लेखक, चित्रकार किंवा कलावंत झाला असता. त्यानें इतरांच्या मानानें जगांतलें कितीतरी पाहिलें होतें. पण लेखक, चित्रकार किंवा कलावंत होण्यास लागणारें वैशिष्ठ्य त्याच्यांत नव्हतें. एकाद्या गोष्टींत निष्णात होण्यास कांहीं काळ घालवावा लागतो. पण नायब अत्यंत अधीर होता. त्यानें शिकण्यासवरण्याचा प्रयत्न केला नाहीं असें नाहीं. पण अशा प्रयत्नाला सुरुवात केली कीं तो अध्यांतच कंटाळून जात असे आणि नंतर शिकणें अर्धवटच राहून जाई. त्याचें सर्व जीवनच असें अर्धवट होतें आणि म्हणूनच तो असा तऱ्हेवाईक झाला असावा; किंवा तो तऱ्हेवाईक होता म्हणूनच त्याचें आयुष्य अर्धवट राहिलें असावें. नायब हा असा होता.

नायब त्या गांवांत शिरला. त्याला तें गांव प्रथम आवडल्यासारखें दिसलें. तेथें त्याला सर्वच कांहीं नवीन दिसत होतें.

मोहरमचे दिवस. मुसलमानी प्रांत. अशा सणासुदीच्या दिवशीं क्वचितच कोणी परगांवीं जातो. त्याचेंहि तसेंच झालें. त्या गांवांत तो एकटाच काय तो परका इसम.

आकाश निरभ्र होतें. वारा वहात होता. स्टेशनवरून तो निघाला तो सरळ गांवांतल्या रस्त्यांवरून हिंडू लागला. रस्ते जवळजवळ ओस होते. सणाचे दिवशीं कोण बाहेर पडतो! भुकेकंगाल फकीरसुद्धां ह्या दिवसांत मशीदींत सांप-

डायचे. तो एकटाच बेफिकिरीनें हिंडत होता, रस्त्यावर दुतर्फा घरें होतीं. त्यांतून त्याच्याकडे अनेक लोक डोकावून मोठ्या आश्चर्यानें पहात. मुसलमान स्त्रिया, दाराचा किंवा खिडकीचा पडदा बाजूला सारून पहात. मुलें हसत आणि माणसें कुत्सितपणानें पाहत आणि कांहीं तरी कुजबुजत.

त्याला मोठी गंमत वाटली. एकांतिक रस्ता. जणूं काय तो त्या गांवचा बादशहा होता. कुणाचा संपर्क नाहीं. त्याला आश्चर्यहि वाटलें. विचित्र गांव आहे!—येथली माणसं रस्ता सोडून चालतात कीं काय न कळे कीं घरांतच राहून जन्म काढतात?–चिकित्सकपणानें तो विचार करूं लागला. गांवाच्या मध्यांत अद्याप तो आला नव्हता. तेथें जाऊन पोंचल्यानंतर कदाचित् आपल्याला आणखी कांहीं नवें अनुभव येतील–कुणी सांगावें?

रस्त्यावरची दुकानें बंद होतीं. सर्वत्र मोठमोठीं कुलुपें लागलेलीं. बरेच दिवसांपूर्वी तेथें येऊन गेलेल्या फिरत्या सिनेमाच्या जाहिराती अर्धवट फाटक्या स्वरूपांत भिंतीवर दिसत होत्या.

गांवाच्या मध्यभागीं तो आला. तेथें एक चौक होता. एकीकडे एक मशीद होती. त्या पांढऱ्या भिंती...ते ऊंच मीनार...तो मोठा कमानी दरवाजा—सारें कांहीं त्याला एकाद्या शुभ्र पिशाच्चाप्रमाणें वाटलें.

नायबला एके काळीं ऐतिहासिक अवशेष पाहण्याची आवड होती. पण त्याला आताशां त्याचाहि तिटकारा येऊं लागला होता. ऐतिहासिक काळांत बांधलेल्या त्या मशीदी. अशा ऐतिहासिक अवशेषांची सारे जग स्तुति करते. तशी स्तुति कोणी करूं लागल्यास, नायबला तें आवडत नसे. आजचे हे अवशेष उभारणारे कारागीर केव्हांच मेले आणि संपले. त्यांचें नांवहि कुणाला ठाऊक नाहीं. त्यांनीं उगाच श्रम केले—वर्षानुवर्षे आपली बुद्धि, कला आणि श्रम खर्च करून ह्या अवजड भयाण गोष्टी तयार करून ठेवल्या—असे विचार त्याच्या डोक्यांत येत आणि त्याला आपले हातपाय थकून गेले असून, आपल्याला झोंप

येत आहे असें वाटूं लागे. इतिहासांतील स्मृति-चिन्हांकडे पाहण्याची नायबची दृष्टि अशा प्रकारची होती.

तो पुढें चालत गेला. एक छोटासा बगीचा दिसला. अगदीं मुसलमानी थाटाचा बगीचा होता. मोठमोठी झाडे. फार जुन्या काळापासून तीं तेथें असावींत. सुंदर फुलें. पण त्यांना वास नाहीं अशी. हिरळ वाढलेली.

तो बागेंत शिरला. कुणीच अडथळा केला नाहीं. कदाचित् त्या गांवांतली ती सार्वजनिक बाग असावी. त्याला भूक लागल्यासारखें वाटलें. बागेंत कुणी रहात असेल तर पहावें असें वाटलें. तो पुढें चालत गेला. एक जुनाट लिंबाचें ऊंच निदाट झाड होतें. त्या खालीं एक पांढऱ्या संगमरवरी दगडाचें थडगें. त्या थडग्यावर हिरवें रेशमी वस्त्र झांकलेलें; आणि त्या वस्त्रांवर कुणी तरी मोगऱ्याची फुलें ठेवलेलीं. तो त्या थडग्याजवळ येऊन थांबला. वारा वहात होता. थडग्यावरील फुलांचा वास किंचित् दूर खळला. झाडाच्या पानांचा सळसळ आवाज झाला. त्याला शांत वाटलें. त्यानें थडग्याकडे पुन्हां नजर टाकली. संगमरवरी दगडाच्या एका कोपऱ्यांत उर्दू अक्षरें कोरलीं होती—तीं त्याला वाचतां येईनांत. त्यानें चहोंभोंताल नजर टाकली. कांहीं अंतरावर एका खोपटांत एक म्हातारा मुसलमान फकीर हुक्का ओढीत बसला होता. नायबला बरें वाटलें. थडग्यावरील उर्दू अक्षरांचा अर्थ कदाचित् तो सांगू शकेल.

त्यानें फकीराला हांक मारली. तो काठी टेकीत जवळ आला. नायबनें त्या उर्दू अक्षरांचा त्याला अर्थ विचारला. तो त्या अक्षरांकडे पहात म्हणाला—

"रझिया बेगम ?"

नंतर फकीर आपणहून सांगू लागला कीं, हें थडगें फार वर्षांपासून येथें आहे–तें रझिया बेगमचें आहे—ती एक फार कर्तबगार सुप्रसिद्ध आणि सुंदर बाई होती म्हणतात...इतकेंच आपल्याला ठाऊक आहे!

एक सुप्रसिद्ध बाई!–सुंदर होती!–तरुण होती!...पण तिनें सुप्रसिद्ध व्हायला केलें काय?–ती केव्हां जन्मली? केव्हां मेली?–याचा कांहींच पत्त

नव्हता. नायबची चिकित्सा वाढली. त्यानें रझिया बेगमसंबंधी त्या फकीराला बरेंच प्रश्न विचारले. पण त्याचें आपलें एकच उत्तर, "फार कर्तबगार होती ती!"

नायबने निःश्वास टाकला आणि अखेरचा प्रश्न विचारला, "कर्तबगार होती हें खरें!-पण तिच्यासंबंधी दुसरी माहिती ह्या गांवांत त्या लोकांजवळून तरी मिळेल का?"

फकीरानें मान हलविली; आणि म्हणाला, "सर्वांना एवढेंच ठाऊक आहे कीं, हें थडगें रझिया बेगमचें आहे.-आणि ती सुंदर होती!-ह्याशिवाय कुणाला कांहीं ठाऊक नाहीं!"

नायबाला स्टेशनवर परत जावयाचें होतें. फकीराशेजारीं तसाच उभा राहून त्यानें कांहीं वेळ त्या थडग्याकडे पाहिलें नंतर थडग्यावरील उर्दू अक्षरांकडे नजर टाकली. थोडा हंसला आणि पुटपुटला-"रझिया बेगम!-कर्तबगार होती-सुंदर होती!-पण आणखी काय!......"

तो भूक विसरला. त्यानें फकीराचा निरोप घेतला. आला होता त्याच वाटेनें परत फिरला. पुन्हां सारें तेंच दृश्य. रस्त्यावरचा तसाच शुकशुकाट. चौकांतली मशीद. तिच्याकडे पाहून त्याला पुन्हां शुभ्र पिशाच्चाची आठवण झाली. तो पुढें चालूं लागला. दुतर्फा दुकानांना कुलुपें लावलेली. रस्त्यावरील घरांतले लोक डोकावून पहात होते. स्त्रिया पडदा बाजूला सारून पहात. मुलें हंसत-माणसें कुजबुजत. नायबसारख्या माणसाबद्दल सर्वांनाच कुतुहल वाटत होतें—सर्वांच्याच डोळ्यांत त्याचा विक्षिप्तपणा भरला—पण-पण—आपल्या सारख्या लोकविलक्षण, क्षुद्र माणसासंबंधीं इतकें कुतुहल करणाऱ्या ह्या लोकांना, रशियाबेगमसंबंधीं माहिती नसावी—ती केव्हां जन्मली व केव्हां मेली ह्याचाहि पत्ता नसावा—तिनें काय केलें ह्याची माहिती नसावी—ह्याचें त्याला सारखें आश्चर्य वाटत होतें!—जग मोठें विचित्र आणि निष्ठुर आहे हेंच खरें!—

नायब स्टेशनवर आला. त्याच्या डोक्यांत अद्याप त्याचः रझिया बेगमचें विचार चालूं होते. फ्लॅटफार्मवर इकडून तिकडे फिरण्यास त्यानें सुरवात केली. गाडी येण्यास अद्याप अवकाश होता. गाडीने जाणारे असें कोणीच दिसत नव्हते. एक म्हातारी मुसलमानबाई कोपऱ्यांतल्या बांकावर बसली होती. लाज झांकण्या-पुरतींच लक्तरें तिच्या अंगावर होतीं—दारिद्र्याची मूर्तिमंत प्रतीमा ! तिच्याकडे नायबचें सारखें लक्ष जाई. ही म्हातारीबाईसुद्धां आपल्या सारखीच असावी. मोहरमचा सण सोडून कुठें जायला निघाली कुणाला ठाऊक ! हिरवें आणि लाल निशाण घेऊन एक पोर्टर फ्लॅटफार्मवर आला. स्टेशनमास्तरच्या खोलीच्या दाराशीं शीळ फुंकीत उभा राहिला. नायब त्याच्याजवळ गेला. गाडी केव्हां येणार तें विचारलें. अजून दहा मिनिटें अवकाश होता. नंतर ती म्हातारी बाई कोण आहे तें त्यानें उगाच विचारून पाहिलें. पोर्टरनें थंडपणानें सांगितलें कीं, " ती रझिया बेगमची वंशज आहे असें ती सांगते. दुसऱ्या गाडीनें ती जाणार आहे. ह्याच गांवांत राहते. गाडी सुटल्यानंतर एक तासानें तिची गाडी येणार होती."

नायबनें विचारलें—" पण रझिया बेगम कोण ? "

पोर्टर म्हणाला,—" ती मोठी कर्तबगार बाई होती. फार देखणी होती. येथें तिचें थडगें आहे ! "

" हो–पण कर्तबगार होती म्हणजे काय ? "

" तें कुणालाच ठाऊक नाहीं. "

" ही म्हातारी तिची वंशज म्हणवते. तिला ठाऊक असेल. "

" तिला काय ठाऊक असणार ? "

" कां बरें ?— "

" जें सर्वांना ठाऊक तेंच तिलाहि ठाऊक आहे. "

" सर्वांना काय ठाऊक आहे ? "

" ती कर्तबगार होती—सुप्रसिद्ध होती, एवढेंच ! "

" ह्याशिवाय आणखी कांहीं... ? "

" कांहीं नाहीं—कुणालाच कांहीं ठाऊक नाहीं ! "

" पण ह्या म्हातारीला कांहीं ठाऊक नाहीं असें कसें ? "

" गांवभर भीक मागून ही लहानाची मोठी झाली. विचारून पहा हवें तर. आपण रझियाचे वंशज आहोंत. ' एवढेंच सांगेल "

नायबनें निःश्वास टाकला. डोकें खाजविलें. म्हातारीकडे पहात विचार करूं लागला—" ही म्हातारी. कर्तबगार सुप्रसिद्ध रशिया बेगमची वंशज. ह्या मुसलमानी राज्यांत रझिया जन्मली असेल आणि येथेंच संपली असेल. तिचे हे वंशज. आज त्यांच्या हातीं भिक्षापात्र आलें. मुसलमान जातींतल्या कर्तबगार, सुप्रसिद्ध मुसलमान स्त्रियांच्या वंशजांना त्यांच्या मुसलमानी राज्यांतच भिक्षापात्र अवलंबण्याचा प्रसंग येतो. मोठमोठ्या मशीदी, उत्तुंग मीनार, ताजमहालासारख्या इमारती बांधणाऱ्या, कोट्यावधी रुपयांचा खर्च करून तो निर्जीव संपत्ती उभारून ठेवणाऱ्या मुसलमानांचे वंशज भिक्षा मागीत हिंडत आहेत !—रझिया कर्तबगार होती; पण तिची आणखी माहिती कुणी देऊं शकत नाहीं. तिचें वंशज हें असे. भिक्षापात्र घेऊन हिंडणारे. असें हें मुसलमानी राज्य. येथें असे कर्तबगार लोक होऊन जातात आणि त्यांचें वंशज अशा स्थितींत जगतात. हीच मुसलमानांची संस्कृति ! "

त्यानें पुन्हा एक निःश्वास टाकला. गाडी फ्लॅटफार्मशीं आली. तो गाडींत बसला. गाडी चालूं झाली. ती म्हातारी तशीच त्या कोपऱ्यांतल्या बांकावर बसली होती. गाडीच्या खिडकींतून नायबनें डोकावून पाहिलें. गाडी पुढें पुढें जात होती. नायबला दिसणारी म्हातारीची प्रतीमा अस्पष्ट होत गेली—नंतर दिसेनाशी झाली.

नायबच्या नेहमीच्या आयुष्यांत, त्या गांवांत घालविलेल्या तीन तासांची आणखी भर पडली होती. रझिया बेगमसंबंधीं मनांत कितीहि प्रश्न उद्भवलें तरी त्यांचें उत्तर मिळणें अशक्य होतें ह्याची त्याला जाणीव होती. पण माणसाचें मन अद्भुत गोष्टीकडे नेहमीच आकर्षित होतें. रझिया संबंधाचा अनुभव असाच

अद्भुत नव्हता का ?—रझिया बेगम !—कर्तबगार रझिया बेगम—सौंदर्यशाली रझिया बेगम !—ती कोण होती ?—कुठें जन्मली ?—तिनें काय कर्तबगारी केली ?—केव्हां मेली ?—ह्या सर्व अनाठाई प्रश्नांचीं उत्तरें तिच्या सोबतच त्या गांवच्या बागेंतील थडग्यांत पुरल्या गेलींत—नायबला त्या प्रश्नांची उत्तरें कधींच मिळणार नाहींत—आणि उद्यांचा दिवस उजाडला कीं, त्याला त्याची पर्वाहि वाटणार नाहीं.

---

## अंधार........................................१

तिनें दार उघडलें. क्षणभर ती मनांत चरकली. दार उघडतांना किंचित् टगळमंगळ केली. दाराच्या कडीवर बोटें थबकून राहिलीं. खालचा ओंठ दांतांनीं दाबला. मन साशंक झालें. दार उघडतांच कोण आंत येणार हें तिला ठाऊक होतें. त्या दोघांत नंतर काय बोलणें होईल ह्याचीहि तिला जाणीव होती. तिची इच्छा नसतांना हें सर्व होणार होतें. असें नेहमींच होई. तें नवें नव्हतें. अनिच्छेनेंच तिनें दारची कडी काढली. नवरा आंत आल्यानंतर त्याच्या नजरेला नजर भिडविण्याची तिच्यांत शक्ति राहिली नसावी.

दार उघडलें. खोलींत सर्वत्र अंधार होता. चूल थंडगार होऊन विसावा घेत होती. तो आंत आला. खुर्चीवर बसला. तिनें काडी पेटविली. अंधारांत लुकलुक-काडीच्या प्रकाशांत तिला कांहीं तरी दिसलें. हृदयांत कडवटपणाची मळमळ जाणवली. अभावितपणें ती त्याच्यापासून कांहीं अंतरावर जाऊन उभी राहिली. तिनें चूल पेटविली. अंधारांत थोडा उजेड निर्माण झाला. तो तसाच झोपला

होता. त्याच्या क्षीण चेहेऱ्यावर औदासीन्य उठून दिसत होतें. कपाळावर केंस अस्ताव्यस्त विखुरले होते. त्याच्याकडे पाहून तिला हळहळ वाटली नाहीं. मनांत संताप मात्र उफळला. त्याचे डोळे किंचित् हलल्यासारखे झाले. जीभ बाहेर काढून त्यानें आपल्या सुकलेल्या ओंठांना ओलावा दिला. त्यानें हळूंच आपला हात तोंडावरून फिरविला आणि तसें करीत असतांनाच अभावितपणे कण्हण्याचा आवाज त्याच्या तोंडून बाहेर पडला. तिनें त्याकडे लक्ष दिल्यासारखें केलें. "अं हें नेहमींचेंच आहे..." ती मनाशीं म्हणाली "...मला ह्या गोष्टींची सवय झाली आहे...माझें मन विटलें आहे. ..."

लहानगी बेबी सारा दिवस आनंदांत होती. आज तिला बरें वाटत होतें. पण सांयकाळपासून पुन्हां ती किरकिर करायला लागली. ती आतां रडूं लागली होती. तिचें रडणें खोलीभर दुमदुमलें. ती अद्याप तशीच उभी होती. बेबी टाहो फोडून रडूं लागली; तेव्हां ती तिच्याजवळ गेली. पण रडणें थांबेना. तिनें तिला थोपटलें आणि त्याचवेळीं हळूंच डोळ्यांच्या कोंपऱ्यांतून त्याच्याकडे पाहिलें. आपल्या सर्व शरीरांतील धमन्या तट्ट फुगल्या आहेत असें तिला वाटलें. हताश जीवनाची तीव्र जाणीव झाली. अशा परिस्थितीत राहून हें सर्व सहन करणें अगदीं अशक्य झाले होतें. त्याचें सर्व शरीर त्या खुर्चीतच वळवळलें. त्यानें आपलें डोकें जोरानें हलविलें. नंतर क्षीण नजरेनें आपल्या बायकोकडे पाहिलें. त्या पाहण्यांत, बायकोच्या निःस्पृहतेबद्दलचें मानसिक दुःख ओंसडत होतें. त्या दुणावलेल्या दुःखामुळें त्याची नजर आणखी क्षीण झाल्यासारखी वाटली. त्यानें मान वळविली. त्याच क्षीण नजरेनें कांहीं वेळ आपल्या बायकोकडे पहात राहिला. नंतर ती नजर त्याच्या लहानग्या बेबीकडे वळली. तिच्या त्वेषाचा पारा चढला. सारी शक्ति एकवटून तिनें स्वतःला सावरल्यासारखें केलें. नंतर त्याच त्वेषानें तिला बोलकें केलें.

"हं !...कसं काय ?" तिनें छद्मीपणानें विचारलें.

तो नुसता पहात राहिला.

"हं !...असं पहात रहायला काय झालं !"

" असं पहात रहायला म्हणजे कसं ?"

" जसं कांहीं ... जसं कांहीं ... मी आणि बेबी ... मे ... लो ... " शब्द खुंटले. तिनें आपला श्वास कांहीं वेळ दाबून धरला. नंतर वाफेने तुडुंब भरलेलें भांडें ताडकन फुटावें आणि वाफ धसाधसा बाहेर उफाळावी तशी ती बोलूं लागली-" हाय रे दैवा! ... अशा स्थितींत तुम्हांला मी प्रथमच पाहते आहे, असं का वाटत तुम्हांला? ... जेव्हांपासून पहातें आहे, तेव्हांपासून तुम्हीं मला असेच, अगदी असेच दिसत आलांत! ... मला ह्या सर्वांचा अगदीं वीट आला आहे! ...वीट आला आहे!"

तिनें निःश्वास टाकला. त्या निःश्वासासोबत एक हुंदकाहि बाहेर पडला. ती पुन्हां बेबीकडे वळली. धपाधपा तिला थोपटूं लागली. तिच्या जड श्वासोच्छ्वासाचा आवाज स्पष्टपणें ऐकूं येत होता. नंतर तसेंच हुंदके जोरजोरानें ऐकूं आले. भावनांना आणि दाबून धरलेल्या दुःखाला तिनें मोकळी वाट करून दिली.

" ... आणि आणखी कांहीं निराळेंच असें आज मला तुम्हांला सांगावयाचें आहे. तुमचा हा सुतक्यासारखा लांब चेहरा आणि सकाळपासून तों थेट रात्रीं घरीं येईतोंपर्यंतची मुखदुर्बळता ह्या सर्व गोष्टींचा मला वीट नि तिरस्कार वाटूं लागला आहे. तुम्ही बेकार निरुद्योगी आहांत म्हणून जर तुम्हांला तसें वाटत असते, किंवा त्यामुळें जर तुम्हीं तसे दिसला असतां, तर मला त्याचें कांहीं वाटलें नसतें, पण खरी गोष्ट तशी नाही! तुम्हांला वाटतें, मी बोळ्यानें दूध पितें आहे, मी मूर्ख आहे...आणि खरें आहे तें! कांहीं असो. एवढें मात्र खरें कीं, तुम्हांला वाटतें तितकी मी खुळी किंवा मूर्ख नाहीं. मला सारं कांहीं कळतं. मी घरांत अगदीं नसल्यासारखें तुम्ही वागतां; आणि लवकरच तसेंच..."

" हें बघ; थोडा वेळ थांब कशी " त्यानें तिला मध्येंच थांबवून म्हटलें "...थोडा वेळ थांब. असं मूर्खासारखं बडबडूं नकोस. तुला आज झालें तरी काय?"

" मी मूर्ख नाहीं " ती ओरडून म्हणाली " आज घरांत शेवटचाच अन्नाचा कण शिल्लक आहे. गेला संपूर्ण महिना मी कशाचा विचार करीत असेन त्याची

कल्पना करा. मी कशाचा विचार करीत होतें, तेंच मला सांगावयाचें आहे. एक तर तुम्ही सदैव घराबाहेर असता. घरांत असलांत कीं, तुमची वाचा खुंटते. मी बोलूं लागलें तर तुम्हीं गुरगुरतां नाहीं तर स्तब्ध बसून राहता. बाहेर गेलांत कीं, तास न् तास तुमचा पत्ता नसतो. मी घरांत एकटी बसून असतें. सारखें असें चाललें आहे. ह्या अशा धुरकटलेल्या घरांत राहणं आणि चार लक्तरं, जीं अंगावर घालायचीहि लाज वाटते, तीं अंगावर घालून मी समाधानांत राहतें आहे, असं कां वाटतं तुम्हांला? तसं वाटत असेल तर चुकता आहांत तुम्ही! मला ह्या सर्व गोष्टींचा तिरस्कार वाटूं लागला आहे! जें किडुकमिडुक घरांत आहे, तें मी होईल तितक्या व्यवस्थितणें ठेवलें आहे; आणि हें सर्व करून त्याबद्दल मला मोबदला काय मिळाला, तर..." तिनें हुंदका दिला आणि बाहेर येऊं पाहणारा दुसरा हुंदका आंतल्याआंत गिळून टाकला "कित्येकदां तर असं वाटतं कीं, माझं तुमच्याशीं लग्न झालं नसतं तर बरं झालं असतं. तुमच्यांत इतका कांहीं बदल झाला आहे कीं, कांहीं सांगवत नाहीं. तुम्हीं आणि तुमचा तो लिहीत असलेला महाग्रंथ; त्यामुळें आपण खूप श्रीमंत होणार होतों म्हणे! तुमच्या त्या महाग्रंथासंबंधी विचार करण्याचें किंवा लिहिण्याचें सोडून, तुमची बायको नि लहानगी मुलगी जिवंत रहावी म्हणून, जर तुम्हीं कुठें नोकरी शोधली असती, तर तें किती तरी बरं झालं असतं!"

त्यानें तिच्याकडे पाहिलें, नजरानजर झाली. कांहीं वेळपर्यंत दोघेही एकमेकांकडे पहात राहिले. नंतर त्यानें एकदम आपली मान वळविली. खुर्चीवरून उठला.

ती चरफडतच होती...

त्या दिवशीं रात्रीं ती निश्चिंत झोंपली. उठल्यानंतर तिनें आपल्या नेहमींच्या घरकामास सुरुवात केली. तिचें घरांतलें काम चालूं असतांनाच, नवरा जागा झाल्याचा आवाज तिला ऐकूं आला. तिनें मागें वळून पाहिलें नाहीं. तिला वाटलें, निदान आपला नवरा तरी कांहीं बोलेल. त्याचें बोलणें ऐकण्यासाठीं तिचे कान आणि मन उतावीळ झालें होतें. तिच्या दृष्टीनं तो अपराधी होता आणि पुन्हां दिलजमाई व्हावी अशी इच्छा असल्यामुळें प्रथम

त्यानेंच क्षमेची याचना करावी असें तिला मनापासून वाटत होते. तिची प्रथम बोलण्याची मुळींच इच्छा नव्हती. तोंडावाटें उच्चारूं नयेत असे शब्द तिनें त्याच्यावर आग पाखडतांना उच्चारले होते. त्याची तिला जाणीव नव्हती असें नाहीं. त्याबद्दल दिलगिरी प्रदर्शित करण्याची तिची मनापासून इच्छा होती. पण त्यासाठीं प्रथम तो बोलावयास हवा होता. प्रथम तो बोलेल कां ? आणि नंतर...

"हं...सकाळ झाली तर ?" तो म्हणाला.

"हं..." तिनें मागें वळून पाहिलें नाहीं किंवा अधिक बोलली नाहीं. त्यानें पुढें बोलावें हीच तिची इच्छा.

तो तिच्याकडे पहात होता. आपण तिच्याजवळ गेलों, तिला बाहुपाशांत घेतलें, आणि 'लाडके!' एवढे शब्द उच्चारले कीं, काम भागण्यासारखें होतें ह्याची त्याला जाणीव होती. पण त्यानें केवळ एक निःश्वास टाकला. तो खोलींतून चालूं लागला. पण तो तिच्याकडे येत नव्हता. तिनें डोळ्याच्या कोपऱ्यांतून हळूंच पाहिलें. त्यानें टॉवेल घेतला आणि हातपाय धुण्यास सरळ दाराबाहेर पडला. तिनें विचार केला "ठीक आहे! तुम्ही जर असेंच थांबणार असाल, तर मी सुद्धां कसें वागायचें तें ठरविलें आहे!"

त्याला आज एका ठिकाणीं नोकरीच्या शोधार्थ जावयाचें होतें. बारा वाजतां जावयाचें होतें; पण तो लवकरच घराबाहेर पडला. त्यानंतर तो परत आला. शांतपणें बसून राहिला. हातांत एक पुस्तक होतें आणि तें वाचण्यांत तो गढून गेल्यासारखा झाला होता. तिनें त्याच्याकडे यत्किंचित् लक्ष दिलें नाहीं. मनाशी एक गाणें गुणगुणत ती घरांतील काम करीत होती. आपण त्याच्या बाबतींत अगदीं पुतळ्यासारख्या मुखस्तब्ध आहोंत हें त्याला दिसावें अशी तिची इच्छा होती आणि त्या दृष्टीनें ती तशी वागत होती. तिला कशाचीच पर्वा वाटत नव्हती. नंतर त्यानें मुकाट्यानें चहा घेतला आणि पुन्हां तो घराबाहेर पडला.

रात्र झाली. तो सारखा चालत होता. रस्त्यावरील दुकानांतून दिव्यांचा प्रकाश बाहेर रस्त्यावर पडत होता. सारें जग जसें कांहीं फुललें होतें. लोकांची

तुफान गर्दी, मोटारींची वर्दळ, येणाऱ्या-जाणाऱ्या स्त्री-पुरुषांचें आपसांत कुजबुजणें त्यांच्याजवळच्या अत्तरांचा दरवळणारा सुवास, आपसांतील कुजबुज, आपसांतील हास्यविनोद ह्यांना ऊत आला होता. पण तो तसाच चालत होता. मनांतलं दुःख बाहेरच्या त्या हंसणाऱ्या जगाला सांगणें शक्य नव्हतें. तो एकटा होता. व्यक्तिशः तो एकटा होता. त्याला फारच एकलकोंड्यासारखें वाटलें...पण त्याला कशाचीच दरकार वाटत नव्हती किंवा कोणतीच गोष्ट त्याला मोहवू शकत नव्हती. कारण आजच्या रात्रीं सर्व जंजाळांतून आपली सुटका होणार आहे ह्याची त्याला जाणीव होती!...लोकांची वर्दळ, आपसांतील कुजबुज, डोकावणारा प्रकाश, अत्तरांचा सुवास...त्या रस्त्यावर, ह्या रस्त्यावर नि ह्या रस्त्यावरून त्या रस्त्यावर...वर्तमानपत्र विकणारीं मुलें ओरडूं लागलीं. सायंकाळीं प्रसिद्ध होणाऱ्या वृत्तपत्राचा ताजा अंक—एक अंक त्यानें हातांत घेतला. 'पाहिजे, ( Wanted )' चें सदर न्याहाळलें...अकाऊंटंट पाहिजे...एजंट पाहिजेत...शिपाई पाहिजेत...आणि नंतर—' Clerk wanted for stockbroker's office. Must have good knowledge of book-keeping and transfer work-also some market experience. Apply giving fullest particulars. ' आपल्याजोगती नोकरी आहे असें त्याला वाटलें. बेकारीच्या ह्या काळांत ह्यापेक्षां दुसरी चांगली नोकरीच असूं शकत नाहीं. त्याला असीम आनंद झाला. आशा उदेली, पण जगापासून विरक्त झाल्याबद्दलची एकांतिक जाणीव मात्र माहींशी झाली नाहीं. असें कां व्हावें ह्याचें त्याला आश्चर्य वाटलें. त्यानें थोडा वेळ विचार केला. वर्तमानपत्राची घडी करून खिशांत ठेवली. पुन्हां थोडा वेळ विचार केला, डोळे घट्ट मिटले आणि जोरानें डोकें हलविलें आणि मनांत विचार आला...असें करून चालणार नाहीं... असें करून चालणार नाहीं!

पुन्हां घराकडे पाय वळले. त्याच्या डोक्यांत विचारचक्र चालूंच होते. विचार चालूं होतें आणि आश्चर्यही वाटत होतें. आपण रस्त्यावरून चालत आहोंत ...जिने चढत आहोंत...आणि उतरत आहोंत; हेंच घर...हेंच घराचें दार...

दार उघडलें...कोट खुंटीवर टांगला...डोक्यावरची टोपी...आपल्या खोलीचें त्यानें दार उघडलें...ती चुलीजवळ बसली होती...लहानगी बेबी वाटलींतून दूध पीत होती...आपली बायको...आपली मुलगी... !

" नोकरी आहे... " त्याचे मन बोललें, तें त्यानें ऐकलें. चुलीजवळ बसल्याबसल्या ती एक जुनें वर्तमानपत्र वाचीत होती.

" म्हटलं, एक नोकरी आहे... " त्यानें अभावितपणें शब्द उच्चारले.

" नोकरी! ...कशाची? ... " तिनें निःस्पृहपणें विचारलें.

" स्टॉकब्रोकरच्या कचेरींत कारकून पाहिजे आहे. "

तिने लगेच वर पाहिलें. बोलण्याची तिची इच्छा होती. पण तिनें स्वतःला सावरलें, ' हं ' एवढेंच म्हटलें आणि पुन्हां ती वृत्तपत्र वाचूं लागली.

त्यानें दौत, लेखणी आणि कागद घेतला. गेलीं कित्येक वर्षें तो पुन्हां पुन्हां जें वाक्य लिहीत होता तेंच वाक्य लिहिण्यास त्यानें पुन्हां सुरुवात केली. फार दिवसपर्यंत जीं माणसें बेकार राहतात, तीं माणसें अशा प्रकारचे अर्ज लिहितांना अत्यंत भावनाशील होत असतात आणि त्या भरांत ' मला एकवार संधी द्या...मी ईश्वरसाक्ष सांगतों कीं, माझें काम तुम्हांला आवडेल ' किंवा ' ही नोकरी जर मला आपण दिली नाहीं, तर मी आत्महत्या करीन ' अशा प्रकारचें कांहीं तरी नेहमींच लिहीत असतात. सर्वसाधारण माणसें लिहितात, तशा प्रकारचाच अर्ज तो लिहीत होता...तींच तीं जुनीं ठरीव वाक्यें लिहीत होता! आणि इतक्यावरहि त्याच्या मनांतील एकलेपणाची जाणीव यत्किंचितहि कमी झाली नाहीं. बायको आणि मूल ह्यांच्यापासून आपण दूर फेकलों गेलों आहोंत ही जाणीव सारखी डांचत होती. त्याला पूर्वी असें कधींच वाटलें नव्हतें आणि असा एकलेपणा जाणवला नव्हता.

त्यानें तो अर्ज पाकिटांत बंद केला. उठून उभा राहिला आणि आपल्या बायकोकडे पाहिलें. तो आपल्याकडे पहात आहे ह्याची तिला जाणीव असूनही

तिनें त्याकडे दुर्लक्ष केले. मान वळवून पाहिलें नाहीं. तीं कशाची तरी वाट पहात असावी. तिचें हृदय सारखें धडधडत होतें. नंतर तो खोलीबाहेर गेला. समोरचें दार उघडलें; पुन्हां बंद केलें. तिनें निराश होऊन चुलीकडे पाहिलें; विस्तवाच्या झोतांत तिचे डोळे चकाकले. नंतर पुन्हां ती वाचूं लागली...

तो चालत चालत सरळ एका इमारतीसमोर येऊन उभा राहिला. दारावरच्या पत्राच्या पेटींत खिशांतलें पाकीत टाकलें. फुटपाथवरील एका कोपऱ्यांत एक इसम उभा होता. तो कसलेसें वाद्य वाजवीत होता. भिकारी असावा. त्यानें त्याच्याकडे पाहिलें. चालूं लागला. आनिरुद्ध भेटला आणि नंतर एका सार्वजानिक बागेंत शिरला.

रात्र झाली. थंडी जाणवूं लागली. हशीखुशीचें आणि बेफामपणें हंसण्याखिदळण्याचें आवाज ऐकूं आले. दोन छचोर दिमणाऱ्या मुली त्याच्या समोरून गेल्या. त्या हंसल्या. त्यांनी पाहिलें. त्यांचे डोळे चकाकले. त्याच चकाकणाऱ्या डोळ्यांनीं त्याला खुणाविलें. त्याला तें असह्य झालें. तो उठला, चालूं लागला. मागाहून त्या दोन मुली खिदळून हंसत असल्याचें त्यानें ऐकलें. त्याच्या मनांत आलें...हें सर्व काय आहे—कशासाठीं आहे?—हास्य, डोळे त्या डोळ्यांतील लकाकी, त्या खुणा, तें खुणावणें, ती उत्तानता, तो उच्छृंखलपणा, ती मिजास, तो बेफामपणा! —ह्यांतूनच माणसाचें जीवन जन्माला येतें—मैत्री आणि मत्सर, जीवनासाठीं धडपड आणि कांचनमृगाचा मोह; जीवननिष्पत्ति आणि जीवनविकृति; कुरूपता आणि सौंदर्य...हें सर्व काय आहे...हेंच मानवी जीवन आहे का?—पण ह्या सर्वांमागें कांहीं तरी अज्ञात असें आहे—तें कांहीं तरी अज्ञात म्हणजेच विशिष्ट कारण! कारणांतून कारण...ईश्वरामागून ईश्वर — आणि शेवटीं ह्या सर्वांचा अंत कशांत तर—अंधःकारांत!...अशा तऱ्हेचे अनेक आनिरुद्ध विचार करीत तो स्वैरपणें भटकत होता. त्याच्या भटकण्याला ताळतंत्र नव्हता. विचारचक्र जोरांत सुरू झालें होतें आणि त्यामुळें आपल्याला वेड लागेल कीं काय, असें त्याला वाटलें.

अकरा वाजण्याचा सुमार असेल. त्यानें दार उघडलें. चूल विझली होती. त्याची बायको आणि मुलगी झोंपी गेले होते. सैंपाकघरांत तीनचार

चपात्या आणि थोडेसे कालवण झांकून ठेवलें होतें. त्यानें पेल्यांत पाणी ओतलें. भूक लागली होती. खाण्याकडे मन सारखें धांव घेत होतें. त्यानें दिव्याची वात थोडी मोठी केली. पाय पोटाशीं घेऊन त्याची बायको झोंपली होती. मुलगीही झोंपली होती. अंथरुणाशेजारीं बायकोचीं दरिद्री वस्त्रें अस्ताव्यस्त पडलीं होतीं. त्या लक्तरांकडे पाहून त्याचें मन हळहळलें—त्याची उदासीनता दुणावली.

त्यानें कपडे बदलले. भांड्यांतलें अन्न पोटांत कोंबलें. त्याचें अंथरूण कोपऱ्यांत ठेवलें होतें. त्यानें दिवा बारीक केला. त्या कोपऱ्यांतच अंथरूण अंथरलें व अंग टाकलें. डोळे मिटले...पण झोंप येणें शक्य नव्हतें. त्या अंधारांत त्याचें मन कशाचा तरी शोध घेत भटकत होतें. त्या अंधारांतील भटकण्याची त्याला भीति वाटली. कसला तरी चांगल्या गोष्टींचा विचार करावा असें वाटलें—तशाच प्रकारच्या कांहीं चांगल्या गोष्टी त्याला हव्या होत्या—चांगल्या गोष्टी करण्याची त्याची इच्छा होती. पण तेथें शेवटीं कांहींच नव्हतें. सर्व इच्छाआकांक्षांचीं केव्हांच राखरांगोळी झाली होती. त्याला कशांतच आनंद वाटणें शक्य नव्हतें.

दिवा मिणमिणत होता. त्यानें डोळे उघडले व त्या दिव्याकडे पहात राहिला. लवकरच विझूं पाहणाऱ्या त्या दिव्याकडे असेच डोळे भरून पाहून घ्यावें असें त्याला वाटलें. भीति वाटली. वरचेवर अंग शहारू लागलें. त्यानें सारी शक्ति एकवटल्यासारखें करून डोळे विस्फारले. तसाच पहात राहिला. हळूं हळूं दिवा विझला. विस्फारलेल्या डोळ्यांना दिसेनासें झालें. अंधार झाला. त्या खोलींत, त्याच्या मनांत आणि बाहेरच्या जगांत, इतकेंच नव्हे तर, असीम अनंतांतसुद्धां ...अंधारच अंधार ! समुद्राची मोठी लाट अंगावर यावी आणि जीव गुदमरून जावा तसा तो अंधार आपल्या अंगावर येत आहे आणि त्याखालीं आपण चेंचून जात आहोंत असें त्याला वाटलें. अंधारांत पडल्यापडल्याच त्यानें आपले हात वर केले; आणि अभावितपणें गुदमरलेल्या स्वरांत त्याच्या तोंडून शब्द बाहेर पडले. "ईश्वरा, ईश्वरा!...मला वांचीव!...हें सहन होत नाहीं!...मला वेड लागेल अशी भीति वाटते!..."—पण त्याच्या हांकेला कोणीं उत्तर दिलें नाहीं—ईश्वरानेंसुद्धां उत्तर दिलें नाहीं...

तो ताडकन् उठला. खोलींतून चालूं लागला. पाय अडखळत होते. तो आपल्या बायकोला हांक मारीत तिच्या अंथरुणाजवळ गेला. गुढगे टेकून तिच्या शेजारीं बसत म्हणाला—"मला भीति वाटते...माझ्याशीं बोल...कांहीं तरी बोल...मला भीति वाटते...!"

ती झोपेंतून दचकून उठली. "अंऽ...अंऽऽ?...काय झालं?" नंतर "शू शू...बेबी झोंपली आहे."

"मला भीति वाटते" हादरलेल्या स्वरांत तो म्हणाला, "भीति...भीति... भीति... !"

त्याच्या पुसट दिसणाऱ्या शरीराकृतीकडे तिनें निरखून पाहिलें. "हाय रे दैवा !—काय झालं तुम्हांला ?" तिनें किंचाळून म्हटलें.

"किती अंधार...किती अंधार... !"

नंतर बेबीची खुसखुस ऐकूं आली. पाठोपाठ तिच्या आवाजानें ती खोली भरून गेली.

"छान केलंत...मला वाटलंच होतं. उठवलंत तिला एकदांचं ?" ती संतापून बडबडूं लागली. ती घाबरल्यासारखीहि झाली होती. "...आणि तुम्हांला झालं तरी काय आहे ?..." नंतर पुन्हां तिनें दटावून विचारलें, "काय झालं तें सांगून टाका एकदां ?"

तो उभा राहिला. त्याची अस्पष्ट आकृति तिला दिसली.

"मला क्षमा कर..." तो हलक्या पण क्षीण आवाजांत म्हणाला, "मला कांहीं झालं नाहीं ! मी बरा आहे !"

तो चालूं लागला. अंधारांत दिसणें शक्य नव्हतें. तो टेबलाजवळ अडखळला. धाड्दिशीं आवाज झाला. नंतर त्याच्या विव्हळण्याचाही आवाज ऐकूं आला. आणि नंतर...नंतर कांहीच ऐकूं आलें नाहीं. तो अंथरुणावर जाऊन परत झोंपला असेल, असेंच तिला वाटलें.

तिनें बेबीच्या अंगावरून हळुवार हात फिरवीत आणि अंगाईगीत गुणगुणत तिला झोंपविलें. तिच्या मनांतली भीति नाहींशी झाली. हृदयाची धडधड मंदावली. त्यानें आपल्या अंथरुणाजवळ यावें आणि एखाद्या लहान मुलाप्रमाणें आपल्याला भीति वाटत असल्याचें सांगावें ह्याची तिला आठवण झाली आणि तिला त्यामुळें अगदीं मेल्याहून मेल्यासारखें झालें–पण समाधान आणि आनंदही वाटला. नेहमीं औदासीन्यानें भारावलेला तिचा नवरा, एखाद्या लहान मुलाप्रमाणें बोलूं शकला, हें पाहून तिला आनंद नि समाधान वाटलें. तिला त्याचक्षणीं आपल्या नवऱ्यासंबंधीं विलक्षण अनुकंपा व सहानभूति वाटली. त्याच्या अगदीं जवळ जावें आणि त्याला घट्ट मिठी मारून चुंबनांचा आणि अश्रूंचा त्याच्यावर वर्षाव करीत सुटावें असें तिला वाटलें...त्यामुळें त्याच्या अंगाला थोडीशी ऊब येईल...समाधानाचा ओलावा मिळेल ! बेबी चांगली झोंपी गेली होती. ती दुसऱ्या कुशीला वळली आणि बेबीचें डोकें आपल्या हातावर घेतलें. तिला कवटाळलें, हळूंच मुका घेतला.

"अहो !–म्हटलं" ती हळूंच म्हणाली, "जागे आहांत कां !"

त्यानें उत्तर दिले नाहीं. उत्तर मिळणें शक्य नव्हतें. शिवाय तो जेथें पडला होता तेथें इतका अंधार होता कीं, कांहींहि दिसणें अशक्य होते.

त्याला गाढ झोंप लागली असेल, असें तिला वाटलें.

ती पुन्हां अंथरुणावर पडली. समाधानाचा निःश्वास टाकला आणि पांघरूण अंगावर ओढलें.

# लाल गुलाब !..............................१०

सारें शहर जवळ जवळ झोंपी गेलें होतें. त्या शहरांतील ती भव्य इमारत–, ती सुद्धां जणूं झोंपी गेली होती. इमारतींतलें दिवे विझले होते. सर्वत्र शांतता आणि गडद अंधार. परंतु तळमजल्याच्या एका खोलींत, दाराच्या बारीक फटींतून मिण-मिणता प्रकाश दिसत होता.

हातांत कंदील घेऊन खोली धुंडाळणारा इसम लगबगीनें चालत असला, तरी त्याच्या पाऊलांचा आवाज होत नव्हता. अशा अपरात्रीं चाललेली त्याची ही लगबग रहस्यमय होती ह्यात संशय नाहीं. त्यानें एक लांब काळसर रंगाचा कोट घातला होता आणि त्या कोटाच्या आंतल्या खिशांतून रिव्हॉल्व्हरची नळी डोकावत होती. त्या मंद प्रकाशांतहि ती नळी चकाकत होती. एकवार तो खोलींतून चालत गेला. त्याच्या चाणाक्ष दृष्टीनें तेथील प्रत्येक वस्तू नीट न्याहा-ळली. नंतर त्यानें एकामागून एक सर्व कपाटांचें आणि टेबलांचे खण शोधलें आणि आवाज न होतां सफाईनें परत बंद केले. कपाटाच्या नि टेबलाच्या खणांतून त्यानें निवडक मौल्यवान् वस्तू तेवढ्या बाहेर काढून ठेवल्या होत्या. वेळ पडल्यास, त्या सर्व वस्तू घेऊन त्याला सहज पळ काढतां आला असता.

त्या खोलीची सजावट डोळ्यांत भरण्या जोगी होती. फर्निचर व्यवस्थित रीतीनें मांडले होते. भिंतीवर मोठमोठीं रंगीत चित्रें टांगलीं होतीं. तीं सर्वच नामां-कित चित्रकारानीं तयार केलीं होतीं. त्या इसमाला तीं चित्रें पाहून आनंद झाला असावा. चित्रांसमोर दिवा धरून, त्या मंद प्रकाशांत तो कितीतरी वेळ तीं चित्रें पहात राहिला. आधाशी माणसासारखें त्याचें डोळे दिसत होते आणि एकाद्या हावरटाप्रमाणें तो त्या चित्रांतील सौंदर्य आत्मसात करीत होता.

त्या इसमाचा चेहेरा विशीर्ण दिसत होता. कदाचित् तो परिस्थितीचा परिणाम असावा–नाहींपेक्षां तो खरोखरीच तरुण होता. त्याच्या चेहेऱ्यावर जीवनाच्या वाताहतीची कळा उमटलेली होती–तो त्रस्त दिसत होता आणि

त्या त्रस्ततेंतहि त्याची बेफिकिर वृत्ति डोकावत होती. तो देखणा होता आणि त्या देखणेपणात त्याच्या रक्तांतील औदार्य अननुभूतपणें प्रकट होतांना दिसत होते.

उमाजी नाईक, तंत्या भिल्ल किंवा बाबू चव्हेवाला ह्यांच्यासारखा सराईत नि धंदेवाईक दरवडेखोर तो नसला, तरी अगदींच नवशिक्या होता असेंहि म्हणतां येणार नाहीं. तसा तो आपल्या कामांत मोठा वाकबगार होता. त्याचें कपडे फाटलेलें होतें. विजारीला जागोजागीं ठिगळें. तो अंगानें सडपातळ होता. त्याचें सुकलेलें ओंठ–तें जणूं काय, त्याच्या जीविताच्या वाताहतीची करुण कहाणी जगाला सांगून टाकण्यास आतुर झालें होतें !

खोली धुंडाळून झाली. नक्षिकाम केलेल्या दहा–बारा मैल्यवान् दागिन्याच्या डब्या त्यानें एकत्र केल्या. नंतर पलीकडच्या कोंपऱ्यांतील रेशमी पडद्याकडे त्याचें लक्ष गेलें. तो त्या पडद्याजवळ गेला. पडदा बाजूला सारला. आंत एक छोटेसें दालन होतें. आपण कोणत्या तरी चित्रकाराच्या स्टुडिओंत आहोंत हें त्याच्या चटकन् लक्षांत आलें.

हें दालनसुद्धां अत्यंत व्यवस्थित स्वरुपांत सजविलेलें दिसत होतें. तेथील जमीन काळ्या रंगाच्या दगडाची होती आणि कंदिलाच्या मंद प्रकाशांत तें दगड चकाकत होतें. अधुनमधून त्यावर लहान लहान इराणी गालिचे अंथरलेलें. खुज्या ताडाचीं झाडें चिनी मातीच्या कुंड्यांत ठेवलेलीं. ती चित्रकाराची खोली होती, हें खास.

त्यानें सभोंवार नजर फेंकली. कांहीं लूट मिळते कीं नाहीं तें पाहिलें. एका लहानशा टेबलावर नक्षिकाम केलेला सोन्याचा एक मौल्यवान स्टँड होता. त्यानें तो स्टॅण्ड हातांत घेतला. त्याकडे तो कितीतरी वेळ आश्चर्यचकित् नजरेनें पहात राहिला. त्याच्या डोक्यांत विचारचक्र चालूं असावें. नंतर अभावितपणें त्याच्या तोंडून एक अर्धनिःश्वास बाहेर पडला. त्यानें चटकन् तो स्टॅण्ड खिशांत कोंबला आणि समोरील कोंपऱ्यांत अर्धवट स्थितींत चित्रित केलेल्या एका चित्राच्या रोखानें त्याचें पाय वळलें. तो त्या चित्राजवळ येऊन थांबला. चित्र अपुरें होतें. त्याकडे तो सारखा पहात राहिला. राहिलेला अर्धनिःश्वास पुन्हां बाहेर पडला. त्याला कांहीं तरी आठवल्यासारखें झालें.

चित्रांतील व्यक्ति देखणी होती. चेहेऱ्यावर पावित्र्य झळकत असलें, तरी त्यांवर कारुण्याची छटा होती. डोळे टपोरे होते पण त्यांत खिन्नता होती. ती लाजाळू दृष्टी जणूं काय, साऱ्या विश्वाचा ठाव घेत होती. जिवणी छोटीशीच पण तींवर मंद हास्याची लकब—नांक धरधरीत आणि शरीरयष्टि उठवळ. राजा रविवर्म्यांच्या 'मोहिनीत'ला बेफामपणा जरी त्या चित्रांत नसला तरी मुजुमदाराच्या चित्रांतील विरागी सौंदर्य आणि सौंदर्यातील असीम औदार्य आणि औदार्यातील अमोल त्याग त्यांत स्पष्ट प्रतिबिंबित झाला होता. तें चित्र खरोखरीच असामान्य होतें. तें अद्याप पूर्ण व्हावयाचें होते. चित्रकारानें अपरिमित श्रम घेतल्याचे स्पष्ट दिसत होतें; तरी पण त्यांत अद्याप बराचसा अपुरेपणा राहिलेला होता. तो अपुरेपणा, त्या अपुरेपणाचें स्वरुप—चित्रकाराच्या ध्यानांत आलें नसावें आणि कदाचित् चित्र पूर्ण झाल्यानंतरहि त्याला त्याची कल्पना येणार नाहीं.

दरवडेखोर त्या चित्राकडे पाहण्यांत रंगून गेला. तो निश्चल उभा होता. सभोंतालच्या वातावरणाचा त्याला विसर पडला. तो स्वतःलासुद्धां विसरुन गेला.

"हं—हें चित्र अद्याप पूर्ण झालेलें दिसत नाहीं." तो कांहींसे पुटपुटत होता, "हं—आलं लक्षांत...पण...पण..." त्यानें नंतर एक जोराचा सुस्कारा टाकला. नंतर पुन्हां पुटपुटला, "इतक्या सुंदर चित्रांत अशी चूक राहून जावी ही खरोखरीच दुर्दैवाची गोष्ट आहे!..."

आपण परक्या ठिकाणीं आहोंत ह्याची त्याला त्यानंतर प्रथमच जाणीव झाली. तो आपल्या विचारतंद्रींतून जागा झाला. खिडकीजवळ गेला. खिडकीवरील पडदा खालीं ओढला. नंतर घड्याळाकडे पाहिलें. दोन वाजण्याचा सुमार होता. त्याने दिव्याचें बटण दाबलें. सर्वत्र झगझगीत प्रकाश पडला. हातांत कुंचला नि रंग घेतलें; आणि कॅनव्हॉसवरील त्या चित्रासोर तो जाऊन बसला. एक तासपर्यंत तेथें सर्वत्र शांतता होती. तो चित्र रंगविण्यांत तल्लीन झाला होता. त्यानंतर घड्याळांत तीनचें ठोके पडलें. त्याचा हात भराभर चालूं लागला. चित्र रंगविण्यांची त्याची पद्धत मोठी सफाईदार होती—तीं पाहून, तो असाधारण प्रतीचा दर्दी चित्रकार असल्याबद्दल शंका उरली नाहीं. त्याच्या कुंचल्यांतल्या प्रत्येक रेषेंत जिवंतपणा होता. रेषा अभिजात होती. तो चेहेरा चित्रित करीत होता.

असेरचें थोडेसें काम शिल्लक राहिलें होतें. ओंठावरचे सूक्ष्म रंग भरलें आणि स्निग्ध मधुर हास्याची कोर उमटली कीं, चित्र पूर्ण होणार होतें. थोडा वेळ उरला होता.

तो चित्राकडे बारकाईनें पाहूं लागला. इतक्यांत त्याला मागून अस्पष्ट चाहूल ऐकूं आली. तो खडबडून उठला. पायजामा नि शर्ट घातलेला एक इसम रिव्हॉल्व्हर रोखून कांहीं अंतरावर उभा होता.

“ तू थोडी जरी हालचाल किंवा आरडाओरड केलीस, तर गोळी घालून ठार मारीन.” ती व्यक्ति गुरगुरली.

दरवडेखोरानें अनिच्छेनें हातांतील कुंचला खालीं टाकला.

त्या दुसऱ्या इसमानें रिव्हॉल्व्हरकडे पहात थंडपणानें म्हटलें, “ मी आत्तांच गोळी घालणार होतो—” नंतर तो छद्मीपणानें हंसला. दरवडेखोराच्या खिशांतून डोकावणाऱ्या रिव्हॉल्व्हरच्या नळीकडे लक्ष गेल्यामुळें तो थोडासा वचकला असावा.

पायजामा नि शर्ट घातलेला इसम त्या स्टुडिओचा मालक होता. कॅनव्हॉसवरील अपूर्ण चित्र रंगविणारा चित्रकार तोच होता. त्यानें थोडा वेळ दरवडेखोरावर दृष्टि रोखली. नंतर तो पुन्हां गुरगुरला, “ माझ्या घरांत शिरून दागदागिन्यावर हल्ला मारण्याचें तुझें धाडस पाहून मला फारसें नवल वाटत नाहीं—कारण तो तुझा धंदा आहे. पण माझ्या चित्राच्या बाबतींतहि ढवळाढवळ करण्याचा तुझा आचरटपणा पाहून मात्र नवल वाटते. हा तुझा आचरटपणा तुझ्या अंगच्या सर्व दुर्गुणांवर मात करणारा आहे ह्यांत संशय नाहीं ! ”

दरवडेखोर किंचित हंसला. त्या हंसण्यांत उपरोधाची छटा दिसली. तो अद्याप चित्रासमोर बसला होता. ‘ पॅलेट ’ आणि कुंचला ह्यांच्याशीं त्याची बोटें अभावितपणें खेळत होतीं. त्याला त्याची जाणीव नसावी.

“ तुमच्या दागदागिन्यावर मी दरवडा घातला. गोष्ट खरी आहे. मी त्याबद्दल अपराधी आहे. मीच कबूल करतो.” दरवडेखोरानें शांतपणें उत्तर दिलें. “ आणि तुमच्या ह्या चित्राच्या बाबतींत ढवळाढवळ करणें ही सुद्धां माझ्या हातून आचरटपणाचीच गोष्ट घडली हेंहि मान्य आहे—पण मी तें चित्र बिघडविलें नाहीं—त्यांत वैगुण्य निर्माण केलें नाहीं, हें तुम्हांला कबूल करावें लागेल.”

चित्रकार कांहींशा अनिच्छेनेंच चित्राजवळ गेला. तें चित्र म्हणजे त्याचें जीव कीं प्राण होतें. गेलें एक वर्ष सतत तो त्या चित्राच्या पूर्ततेसाठीं झटत होता. आयुष्यांतील त्याची ती महान् कलाकृति होती.

" By jove ! " अभावितपणें त्याच्या तोंडून शब्द बाहेर पडले. तो थोडा वाकला आणि सूक्ष्म दृष्टीनें चित्राकडे पाहूं लागला. नंतर दरवडेखोराकडे वळून म्हणाला, " तू कोण आहेस हें मला ठाऊक नाहीं. पण एक गोष्ट मात्र खरी—तू चित्रकलेंत निष्णात आहेस ! "

दरवडेखोर पुन्हां किंचित् हंसला आणि किंचित् खालीं वाकला. " तुमची खुशामत करण्याची पद्धत पाहून मला अभिमान वाटतो. " तो उपरोधानें म्हणाला. परंतु त्या उपरोधांतील मर्म चित्रकाराच्या ध्यानांत आलें नाहीं. तो फारच गोंधळून गेला. त्यानंतर पुन्हा उद्‌गारला, " Oh !– Its marvellous ! गेलें कित्येक दिवस हें expression आणण्याचा मी आटोकाट प्रयत्न करीत होतो. तुला तें अगदीं बरोबर साधलें. " त्याची दृष्टि चित्रावर खिळली होती.

" आणि ह्या चित्राचें मॉडेल म्हणजे...... " दरवडेखोरानें पृच्छा केली.

" माझी बायको ! " चित्रकारानें तडक उत्तर दिलें. " ती एक असाधारण सुंदर बाई आहे. तिच्या त्या सौंदर्याची आगळीक होईल अशी मला सारखी भीति वाटत होती, हें चित्र रंगवितांना ! पण......पण...... "

त्यानें समाधानाचा निःश्वास टाकला. नंतर तो कांहींशा आपुलकीच्या भावनेनें बोलूं लागला. " हें बघ. चित्रकाराच्या दृष्टीनें सर्वगुणसंपन्न असावी अशीच माझी बायको आहे. तिचें सौंदर्य अवर्णनीय आहे; आणि म्हणूनच मी तिच्याशीं लग्न केलें, असे म्हटल्यास मुळींच हरकत होणार नाहीं. पण तिच्यांत एक मोठें वैगुण्य आहे. ती तशी फारच थंड स्वभावाची आहे आणि जगाकडे पाहण्याची तिची दृष्टि अत्यंत तऱ्हेवाईक आहे. त्यामुळें ती कोणत्याहि गोष्टीचा एकांगीपणानेंच विचार करते. तो भाव तिच्या डोळ्यांतहि स्पष्ट दिसतो. नेहमीसाठीं ही गोष्ट विशेष लक्षांत घेण्याजोगी नसली, तरी ती मॉडेलसाठीं बसते त्या वेळीं तो दोष सारखा जाणवतो. तिच्या दृष्टींत जिवंतपणा आणण्याचें मी खूप प्रयत्न केलें—पण व्यर्थ! माझें असें प्रयत्न सुरू झालें कीं ती नुसती हंसते

आणि ह्मणते कीं, ' मी आहे ही अशी आहे '—सांग आतां ह्याला कोणता उपाय आहे? पण मला हवें होतें तें expression तू आणूं शकलास हें खरें. Its wonderful; you might almost have seen her"

दरवडेखोर हंसला आणि म्हणाला, " शक्य आहे. जगांत कित्येकदां अशक्य गोष्टीसुद्धां शक्य झालेल्या दिसतात !—पण तुम्हीं आतां म्हणतां तें कांहीं तशांतलं नाहीं."

नंतर थोडा वेळ कुणीच कांहीं बोललें नाहीं.

" हं. हें बघ " चित्रकार उद्धटपणें म्हणाला, " तू पक्का बदमाष आहेस ह्याबद्दल शंकाच नाहीं. तू वर्तनानेंहि कांहीं बरा नसावास. तुझ्या वागणुकीवरून तसं दिसतं आहे. पण तू एक चांगल्यापैकीं कलावंत आहेस. तेव्हां चोरलेल्या माझ्या सर्व वस्तू परत केल्यानंतर मी तुला एका अटीवर सोडून देणार आहे..."

" कोणती अट ?" दरवडेखोरानें आश्चर्यानें विचारलें. त्या आश्चर्यांत आतुरता नसली, तरी चिकित्सकपणा खास होता.

" अट एवढीच कीं, तू हें चित्र पूर्ण केलें पाहिजे ! "

" मोठ्या आनंदानें मी तें पूर्ण करीन " तो शांतपणें उत्तरला "—आणि तसें पाहिलें तर आत्तापर्यंत मी जें हें चित्र पूर्ण केलें तें मला वाटलें म्हणूनच केलें —आत्मस्फूर्तीनें केलें—शिपायांची भीति वाटली म्हणून नव्हे ! "

नंतर तो शांतपणें हंसत हंसत उठला. निर्धास्तपणें दुसऱ्या खोलींत गेला. दिवे लावलें. सर्वत्र प्रकाश झाला. त्यानें सर्व वस्तू गोळा केल्या. सोन्याचा स्टॅण्ड तेवढा खिशांत ठेवला आणि त्या वस्तू मुकाट्यानें चित्रकाराच्या स्वाधीन केल्या. चित्रकार त्याच्याकडे आश्चर्यानें पहात राहिला. नंतर त्यानें घड्याळाकडे पाहिले आणि म्हटलें, " हें बघ. आतां साडेतीन वाजण्याचा सुमार आहे. सकाळीं आठचे सुमारांस नोकरमाणसें येतात. तब्बल चार तास अवकाश आहे. चित्र जवळ जवळ पूर्ण झाले आहे. थोडेबहुत काम बाकी आहे, तेवढे ह्या चार तासांत आटोप कसे !"

त्यानें दुसरे दिवे लावले. नंतर दरवडेखोर पुन्हां कॅनव्हासच्या चित्रासमोर जाऊन बसला आणि म्हणाला, " चार तास मला पुरे आहेत. त्यापूर्वींच हें चित्र संपवून मी मोकळा होईन..."

त्यानंतर त्यानें कुंचला उचलला आणि एक शब्दहि न उच्चारतां चित्र रंगविण्यास सुरुवात केली.

स्टुडिओंत सर्वत्र निःस्तब्ध वातावरण पसरलें. दरवडेखोर चित्र रंगविण्यांत तल्लीन झाला जणूं काय त्या चित्रावर त्याच्या आयुष्याची सर्व मदार होती! चित्रकार शेजारीं बसला होता. कांहीं वेळानें अपरिहार्य म्हणून त्यानें विचारलें, "तिच्या हातांत लाल गुलाबाचें फूल काय म्हणून दिलें?...दुसरें कोणताहि... ...कोणत्याहि रंगाचें...फूल अधिक शोभून दिसलं असतं......?"

दृष्टि न वळवितां दरवडेखोर म्हणाला, "तसं तुम्हांला शक्य झालं असतं... पण तशी इच्छा नाहीं—लाल रंगाचं गुलाबाचं फूलच अधिक शोभून दिसेल!"

चित्रकार कांहीं बोलला नाहीं.

अरुणोदयाचे लाल रंग पूर्वाकाशांत दिसूं लागले. दरवडेखोरानें कुंचला खालीं ठेवला. उठून उभा राहिला. त्यानें चित्राकडे दृष्टि रोखली. कितीतरी वेळ तो पहात होता. नंतर दोनहि हात चोळलें आणि समाधानाचा निःश्वास टाकला.

"By Jove" चित्रकार उद्गारला, "माझ्या आकांक्षा पूर्ण झाल्या!"

दरवडेखोर किंचित् हंसला.

"तू होतास म्हणूनच हें साध्य झालें." चित्रकार अभिमानानें म्हणाला. "चित्र रंगविण्याला मी सुरुवात केली. पण तें पूर्ण करणें मला अशक्य झालें. तू आला नसतास तर...तर..." नंतर मध्येंच तो किंचाळून म्हणाला, "तुझ्यासारखीं कलावान गुणी माणसें हीं असली चोरीची कृत्यं करायला धजतात तरी कशी...?"

दरवडेखोराने हंसून खांदे उडविलें.

चित्रकाराने दरवडेखोराच्या नजरेला नजर भिडविली. तेथें त्याला शुष्क वाळवंट पसरलेलें दिसलें...आयुष्याची उधळपट्टी नजरेला आली. गुण मातीमोल झालेले दिसले! त्यानें आणखीं खोलवर दृष्टि रोखली. दरवडेखोराचे कृष शरीर—निस्तेज डोळे—सुकलेले ओंठ—फाटकी लक्तरें—दारिद्र्याचें मूर्तिमंत चित्र! तें पाहून त्याला जमीनदोस्त होत असलेल्या पडक्या ऐतिहासिक प्रासादाची आठवण झाली!

" तुला भूक लागली आहे का ?" चित्रकारानें विचारलें.

" गेले कित्येक दिवस अन्नाला शिवलो नाहीं !" अनिच्छेनें तोंडावाटें उत्तर बाहेर पडलें.

" आतां अजून अर्धा-पाऊण तास अवकाश आहे गडीमाणसं यायला नि स्टुडिओ उघडायला. मी घरांत जातो नि कांहीं खायला घेऊन येतो."

चित्रकार बाहेर गेला. आपल्या गैरहजेरींत दरवडेखोर पळून जाईल अशी शंका देखील त्याच्या मनाला शिवली नाहीं.

शेजारच्या खोलींतून एक नाजुक, सुस्पष्ट आवाज ऐकूं आला. त्या आवाजानें त्या शांततेचा भंग केला. दरवडेखोर चपापला. त्याचें डोळे आखुसले. हृदय धडधडूं लागलें. हा आवाज आपण पूर्वी कधीं ऐकला असावा अशी शंका आली. पूर्वायुष्यांतील कांहीं मधुर स्मृतींची चित्रें त्याला दिसलीं आणि क्षणांत नाहींशीं झालीं. आपण स्वप्न तर पहात नाहीं नां, असें त्याला वाटलें.

" इतक्या सकाळीं उठून तुम्हीं घरांत हा काय गोंधळ मांडला आहे ?-मला तर वाटलं कीं, घरांत कोणी चोरच शिरला...... "

" मी चित्र रंगवीत होतो. माझा एक मित्र मला अनायासें भेटला. दोघेहि बसलों रात्रभर चित्र रंगवीत-आणि संपवून सुद्धां टाकलं. आम्हांला थोडी भूक लागली आहे. तेव्हां खायचं शोधीत होतो...."

" पण ही सारी यातायात तुम्हांला नको होती करायला-मला सांगायचं होतं-हो पण, तुमच्या मित्राला चहालाच ठेवून घ्या कीं !..."

नंतर ती स्टुडिओंत आली. रेशमी पडदा बाजूला केला. आंत पाऊल टाकलें. ती चित्रांतील सुंदरी-चित्रकाराची बायको होती. ती उभी राहिली. मागें लाल रंगाचा रेशमी पडदा होता. सुंदर स्त्रीच्या संगमरवरी पुतळ्यासारखी ती दिसत होती. कांहीं वेळानें ती पुढें गेली. चित्रासमोर जाऊन उभी राहिली. नंतर तिनें खिडकीकडे नजर वळविली. दरवडेखोर तेथें उभा होता. ती एकदम उद्गारली, " तू...तू...ह्या वेळीं तू येथें कसा !...ह्यांच्याशीं तुझी ओळख आहे ह्याची मला जाणीव नव्हती... " ती त्याच्याजवळ येऊन उभी राहिली. त्याचा हात तिनें आपल्या हातांत घेतला.

तो बराच वेळ तिच्याकडे पहात उभा होता. त्याची दृष्टि कांहीं तरी शोधीत होती. नंतर त्यानें तिचे हात दूर केले आणि कांहीं अंतरावर जाऊन उभा राहिला.

" नाहीं, आज पहाटच्या तीन वाजेपर्यंत तरीं तुझा नवरा आणि मी स्वतः मित्र नव्हतो " तो शांतपणें बोलत होता. " आणि आम्हीं मित्र कसे झालों ह्याची जर तूं हकीकत ऐकशील, तर तूं माझा तिरस्कार करुं लागशील–आपण एकें काळीं मित्र होतो ह्याची तुला लाज वाटूं लागेल !" त्यानें चित्रकाराच्या रिव्हॉल्व्हरकडे बोट दाखवीत म्हटलें, "तें पहा. त्यावरून तुला कळेल कीं, माझें येणें हें सामान्य माणसाचें येणें नव्हतें–" नंतर त्यानें टेबलावरील दागिन्यांकडे बोट दाखवून म्हटले, "माझ्या येण्याचा हा उद्देश होता."

ती ओरडेल, किंचाळेल असें त्याला वाटलें. पण तसें कांहीं झालें नाही. ती निश्चल उभी होती. तिचे टपोरे डोळे कांहीं तरी शोधीत होते.

जणूं कांहींच झालें नाहीं—जें झालें त्याचा आपल्यावर तिळमात्र परिणाम झालेला नाहीं—अशा वृत्तीनें ती म्हणाली, " पण...पण...तुझ्यासारख्या अभिजात कलावंताने हा मार्ग पत्करावा हें नवलच म्हटलें पाहिजे ! ह्या चित्राची मातब्बरी मी ओळखतें–ह्या चित्राला पूर्ण करणाराचीहि किंमत मला करतां येते. तूं कलावंत आहेस आणि...आणि...तूं हें......"

तो हंसला आणि म्हणाला, " पण माझी कला भूतकालाबरोबरच भूतकालात अंतर्धान पावली ! सात वर्षांपूर्वीच माझ्या महत्त्वाकांक्षेसोबत ती नाहींशी झाली !-मला आतां ह्या डाकूगिरींतच गंमत वाटते–त्यांत जिवंतपणा जाणवतो !"

" होय—सात वर्षांपूर्वी !...मला सोडून तू निघून गेलास ...!"

" तुझ्या सुखासाठीं !—तुझ्यासुखासाठीं मी निघून गेलो ! तुला सुख हवें होते–श्रीमंती हवी होती. सुख आणि श्रीमंती देणारा माणूस तुला भेटला. त्यानें दोनहि गोष्टी तुला दिल्या. माझ्या सोबत राहिली असतीस, तर झोंपडींत दिवस काढावें लागलें असते. चित्रकलेवर जिवंत राहण्याचें दिवस आतां राहिलें नाहींत "

" खरं आहे. मला श्रीमंती हवी होती. पण आज असं वाटतं कीं, झोंपडींतसुद्धां नंदनवन निर्माण करतां येत..."

तो तिच्या जवळ गेला व म्हणाला, "शहरांतले सारे पोलिस शिपाई माझ्या शोधांत आहेत. मी एक बदमाष लुटारु आहे हें कळल्यानंतरहि तुला माझ्यासंबंधी सहानुभूति नि प्रेम वाटतं का ?"

त्या दोघांची नजर एक झाली. त्यांत हळुवारपणा होता. त्या नजरेंतून दोन पारवे उडाले. एकमेकांच्या मनांतले संदेश एकमेकांना पोचवून परत आले. तिच्या नजरेंत चैतन्य दिसलें. तें चैतन्य तिच्या नवऱ्याला कधींच दिसूं शकलें नाहीं; आणि आणखी जें कांहीं तिच्या नवऱ्याला कधीं दिसलें नाहीं, तें त्या वेळीं तिच्या चेहऱ्यावर उमटलें!

"मला तुझ्यासंबंधी नेहमीच सहानुभूति नि प्रेम वाटत आलं आहे!—गेलीं सात वर्षें!—तीं मी यातना भोगण्यांत काढलींत! तुझी आठवण बुझणें शक्य नव्हतें. तुझी परिस्थिति!—तिच्याकडे पाहून मला हळहळ वाटते—डोक्याला तडे पडतील असं वाटतं!"

स्त्रीस्वभावसुलभ हळुवार सहानुभूतीनें तिनें त्याचा हात आपल्या हातांत घेतला. त्यानें तिच्या हाताचें चुंबन घेतलें. नंतर तो म्हणाला, "मला आणखी एक गोष्ट सांगावयाची आहे. तुझ्या नवऱ्यानें मला सर्व दागिने परत मागितले. मी तें त्याला देऊन टाकलें.. पण एक वस्तू ठेऊन घेतली. मला क्षमा कर!"

त्यानें सोन्याचा स्टँड खिशांतून बाहेर काढला आणि हाताच्या तळव्यावर ठेवला. तिनें त्याकडे पाहिल्या न पाहिल्यासारखें केलें आणि म्हटलें, "असूं दे तें तुझ्याजवळ. ह्यापुढें आपण कदाचित् कधींच भेटणार नाहीं. तुला कधींच कांहीं दिलें नाहीं. माझी आठवण म्हणून तें असूं दे!"

"तुला लाल रंगाच्या गुलाबाचीं फुलें फार आवडायचीं—आठवतं का? तुला कित्येकदां तशीं फुलं आणून दिलींत—पण एकदांसुद्धां तूं मला कधीं त्यांतलं फूल परतभेट म्हणून दिलं नाहींस—आपलं प्रेम दर्शविलं नाहींस. नंतर कांहीं दिवसांनीं तुझ्या नवऱ्याच्या कोटावर मी लाल गुलाब पाहिला.तो तूं त्याला दिला होतास. आपले प्रेम जाहीर केलं होतं. त्याच दिवशीं मी निघून गेलो—आठवतं कां?"

तिनें मान हलविली.

"नाहीं—नाहीं!—तसं नव्हतं रे कांहीं!—तुझ्या जाण्यामुळें मला कोण यातना झाल्या—मी नि माझें हृदय शतशः विदीर्ण झालें!—आणि आज!—पण

आज तुझी भेट फारच उशीरानें झाली!—आतां उपाय नाहीं! माणसाच्या आयुष्यांत सर्वच गोष्टी उशीरा उमजतात—सर्वच गोष्टी उशीरा लाभतात!"

"होय!—खरोखरीच उशीर झाला आहे!" साऱ्या जगांतले ते उदासवाणें शब्द होतें. "पण तुझं लग्न झालं आहे. तुझ्या नवऱ्याचं तुझ्यावर निरतिशय प्रेम आहे—त्या प्रेमाला दुखवूं नकोस हेंच तुला पुनःपुन्हां सांगतो. हा सर्व उपदेश करण्याचा माझ्यासारख्या बदमाषाला कांहीं अधिकार नाहीं. पण ओंठावर आलें म्हणूनच बोललो. आपल्यासंबंधीं त्याच्याजवळ कधींहि कांहीं बोलू नकोस—तूं सुखी होशील!"

इतक्यांत चित्रकार कांहीं खाण्याच्या वस्तू घेऊन तेथें आला. त्या त्यानें टेबलावर ठेवल्या. नंतर त्याची नजर रिव्हॉल्व्हरवर गेली. आपल्या बायकोच्या नजरेला तें आलें नसावें अशी त्यानें आपली समजूत करून घेतली. त्यानें तें लपविण्याचा प्रयत्न केला. परंतु त्याची ती हालचाल तिच्या नजरेंतून हुकली नाहीं. तिनें तें सर्व ओळखलें—पण बोलली नाहीं.

ती तात्काळ परत फिरली. खोलीबाहेर गेली. खोलीबाहेर पडतांना तिनें मागें वळून पाहिलें नाहीं.

दरवडेखोरानें पोटभर खाल्लें. भुकेपुढें जगांतील सर्व दुःखें दुय्यम प्रतीची ठरतात. गेलें कितीतरी तास नि दिवस तो जेवला नव्हता. त्या दिवसांची नि तासांची त्यानें मोजदाद ठेवली नव्हती. जवळ जवळ उपाशी राहण्याची त्याला संवयच झाली होती.

खोलींतील विजेच्या दिव्याचा प्रकाश फिक्कट वाटूं लागला. दिवस उजाडला होता. रस्त्यावरील वाहतुक सुरुं झाली होती. दरवडेखोर उठला. सरळ दाराकडे गेला. कडी काढली. सकाळच्या त्या कोमल उन्हांत त्यानें बाहेरच्या फुटपाथवर पाऊल टाकलें नाहीं तोंच...

—त्याची दृष्टि मागें वळली. इमारतीच्या खिडकींत कोणी तरी उभें होतें. त्या व्यक्तीचे डोळे पाणावलें होतें. त्याचेहि डोळे भरून आले. त्यानें खालीं मान घालून चालावयास सुरुवात केली. इतक्यांत त्याच्या पायाजवळ कांहींसें रंगीत, सुवासिक नि मऊ मऊ पडल्यासारखें त्याला वाटलें—तें लाल गुलाबाचें ताजे फूल होतें!